


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# भाषा आणि जीवन

मराठी : अभ्यास : परिषद : पत्रिका

वर्ष २३ । अंक १ । हिवाळा २००५

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



मराठी अभ्यास परिषद

## अनुक्रमणिका



**मुखपृष्ठासंबंधी :** विविध ऋतूंमध्ये निसर्गात होणाऱ्या बदलांचा चित्ररूप मागोवा घेण्यासाठी अक्षरांच्या साह्याने वातावरणनिर्मिती केली आहे. ही अक्षरे पूर्णपणे नवनिर्मित असून संगणकावरच घडली आहेत. म्हणजेच यात पारंपरिक लेखन-साधनांचा वापर अजिबात केलेला नाही. आजच्या 'संगणक-युगा'त सौंदर्य-निर्मितीसाठी संगणक वापरतानाच संगणकामुळे सहजसाध्य होणाऱ्या कलात्मक परिणामांमुळे आपल्याही दृश्यकलाविषयक जाणिवा समृद्ध होत आहेत.

चित्रकल्पना व अक्षर-निर्मिती : विनय सायनेकर; दृश्य संकल्पन व संगणकसाहाय्य : सुप्रिया खारकर

**संपादक :** प्र.ना. परांजपे
**संपादन-समिती :** प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी
**संपादन सल्लागार :** अशोक रा. केळकर, गं.ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, २७१, नारायण पेठ, पुणे ४११ ०३०.

**या अंकाचे मूल्य रु. २५/-**

संपादकीय

# मराठीच्या विकासाच्या वाटा : २ विद्यापीठांत भाषांतर-विभाग

केवळ भाषेच्या विकासातच नव्हे; तर एखाद्या प्रदेशाच्या बौद्धिक संपदेच्या विकासात भाषांतरे महत्त्वाची भूमिका बजावू शकतात हे नव्याने सांगण्याची आवश्यकता नाही. ग्रीक, लॅटिन या भाषांतील ग्रंथांची अरबी भाषेच्या माध्यमातून युरोपीय भाषांत जी भाषांतरे झाली, त्यामुळे युरोपमधील मध्ययुगातील अज्ञानरूपी अंधार नष्ट होऊन तेथे नवजागरणाची पहाट झाली. आपल्याकडेही इंग्रजी (व संस्कृत)मधून देशी भाषांत भाषांतरे होऊ लागल्यानंतर आधुनिक युगाची नांदी झाली. भाषांतरांचे महत्त्व ओळखल्यामुळेच वेळोवेळी भाषांतरांना उत्तेजन देण्याचे, योजनापूर्वक भाषांतरे करवून घेऊन ती प्रकाशित करण्याचे प्रयत्न झाले. दीडशे वर्षांपूर्वीची दक्षिणा प्राइज कमिटी आणि महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेनंतर साहित्य आणि संस्कृती मंडळाचा भाषांतर विभाग यांची उदाहरणे आपल्याला माहीत आहेतच. सोव्हिएत रशियानेही आपल्या संघराज्यांतील कमी विकसित भाषांचा विकास व्हावा म्हणून (व अन्य राजकीय उद्दिष्टांसाठी) भारतातील (व अन्य आशियाई व आफ्रिकी राष्ट्रांतील) भाषांतून सुमारे १५ संघराज्यीय भाषांत भाषांतरे करून घेऊन प्रकाशित केली होती.

भाषांतरामुळे लक्ष्य भाषेतील बौद्धिक संपदेत भर पडते, त्या प्रदेशातील बुद्धिवंतांसाठी उपलब्ध असलेली क्षितिजे विस्तारतात हे खरेच; पण त्या लक्ष्य भाषेचाही विकास होतो. भाषांतर करताना नवीन शब्द तयार केले जातात, उपलब्ध शब्दांना नवे अर्थ दिले जातात, नवीन संकल्पना व्यक्त करण्यासाठी नवीन रचना केल्या जातात आणि एकंदरीत भाषेची लवचिकता वाढते, अर्थ व्यक्त करण्याची क्षमता वाढते. त्यामुळेच भाषेच्या विकासात भाषांतरे अतिशय उपयुक्त व मोठा हातभार लावतात. पण गेल्या दीडशे वर्षांमध्ये मराठीत झालेल्या भाषांतरांकडे नजर टाकली तर असे दिसते की भाषांतरासाठी निवडलेले ग्रंथ आणि भाषांतर-पद्धती यांत सुसूत्रतेचा, योजनाबद्धतेचा फारसा प्रत्यय येत नाही. हा सर्व प्रदेश हौशे, नवशे व गवशे लोकांसाठी राखून ठेवला गेला आहे. साहित्य संस्कृती मंडळाने ग्रंथांच्या याद्या केल्या, शक्यतो त्या त्या क्षेत्रांतील जाणकारांवर भाषांतराचे काम सोपवले, पण भाषांतराबाबत मार्गदर्शक तत्त्वे तयार केली नाहीत. शिवाय, चांगले भाषांतरकर्ते तयार व्हावेत यासाठीही काही प्रयत्न केले नाहीत.

भाषांतराचा संबंध अनेक विद्याशाखांशी येतो. भाषा, साहित्य, भाषाविज्ञान, समाजविज्ञान, मनोविज्ञान, इतिहास, तत्त्वज्ञान, संबंधित विषय अशा ज्ञानशाखा भाषांतराच्या घटनेत गुंतलेल्या असतात, त्यामुळेच अशा सर्व ज्ञानशाखांमध्ये अध्यापन व संशोधन जेथे चालते अशा विद्यापीठांना भाषांतराच्या क्षेत्रात सुसूत्र व शिस्तबद्ध रीतीने महत्त्वाचे काम करणे शक्य आहे. यासाठी विद्यापीठांनी भाषांतर-विभाग स्थापन करणे जरुरीचे आहे. [येथे काही वाचकांना जादवपूर व मुंबई विद्यापीठातील ''तौलनिक साहित्य'' विभागांचे स्मरण होईल. पण ''तौलनिक'' व ''साहित्य'' या दोन संज्ञांमध्येच त्या विभागांच्या मर्यादा अनुस्यूत आहेत. एक तर दोन (किंवा अधिक) भाषांतील साहित्यांच्या काही वैशिष्ट्यांची ते उपलब्ध भाषांतरांमार्फत तुलना करतात (पण भाषांतरे करतातच असे नाही) आणि ते फक्त साहित्यच विचारात घेतात, साहित्येतर ज्ञानशाखा त्यांच्या कक्षेत येत नाहीत.] विद्यापीठाच्या सर्व विभागांतील भाषांतरात रस असणाऱ्या एकेका (किंवा अधिक) अध्यापकाला भाषांतर-विभागाशी संलग्न केले आणि त्या सर्वांचा समन्वय साधण्यासाठी एखाद्या तज्ज्ञाची नेमणूक केली तर मोठे काम पार पाडता येणे शक्य होईल.

मराठीत भाषांतरित व्हायला हवीत अशा विविध ज्ञानशाखांतील मूलभूत ग्रंथांच्या याद्या तयार करणे, त्या ग्रंथांवरील परिचयात्मक लेख तयार करणे, पारिभाषिक प्रश्न सोडवणे, शक्य त्या ग्रंथांची भाषांतरे करणे, ती प्रकाशित करणे, भाषांतराचे अभ्यासक्रम चालवणे, भाषांतरांचे मूल्यमापन करणे, भाषांतरविषयक नियतकालिक चालवणे, चर्चासत्रे आयोजित करणे अशी अनेक कामे भाषांतर-विभागांना करता येतील. त्यासाठी फार खर्च येईल असे नाही. केंद्रीय व राज्य पातळीवरील संस्थांकडून या विभागांना आर्थिक साहाय्य मिळू शकेल. शिवाय विद्यार्थ्यांचे शिक्षणशुल्क, प्रकाशनांची विक्री यांमधूनही काही निधी उपलब्ध होईल.

वानवा आहे ती कल्पनाशक्तीची, इच्छाशक्तीची आणि योजकतेची. ■

**प्र. ना. परांजपे**

### मृत भाषेला संजीवन

मृत असलेली भाषा पुन्हा जिवंत होण्याचे जगातील बहुधा एकमेव उदाहरण हिब्रू भाषेचे. १९४८मध्ये इस्रेल राष्ट्राची निर्मिती झाल्यानंतर त्या राष्ट्राने हिब्रू या आपल्या धर्मभाषेलाच राष्ट्रभाषा म्हणून घोषित केले आणि योजनापूर्वक निश्चयाने तिचा विकास केला. मात्र आपल्या वर्णमालेतून त्यांनी 'ह' या अक्षराला हद्दपार केले. - कारण छळछावण्यांमध्ये डांबून लाखो ज्यूंची हत्या करणाऱ्या हिटलरचे नाव 'ह'पासून सुरू होते !

**(आधार : दै. 'सकाळ', ८-१-२००५, पुरवणी पृ. ३)**

# मराठी संगणकीय चलन-प्रणालीची पायाभरणी

**अशोक शहाणे**

संगणकाचा उपयोग करण्यासाठी इंग्रजीचे ज्ञान आवश्यक आहे ह्याबद्दल कुणीच शंका घेत नाही. त्या दृष्टीने इंग्रजी माध्यमाच्या शाळेत मुले पाठवण्याचा निर्धार पदराला धस लावूनही पालक करतात.

हा समज का ? तर संगणकाच्या कळफलकावर सगळी अक्षरे रोमन (इंग्रजी) लिपीत दिसतात, व रोमन अक्षराची कळ दाबल्यावर तेथील अक्षर समोरच्या पडद्यावर दिसते. तसेच संगणकाबद्दलची माहिती देणारी पुस्तके मोठ्या प्रमाणावर इंग्रजीतूनच लिहिलेली दिसतात. संगणकाकडून काम करून घेण्यासाठी त्याला द्यायच्या आज्ञा इंग्रजीतूनच द्याव्या लागतात. संगणकाचे ज्ञान असणाऱ्यांना अमेरिकेसारख्या देशात जाणे व नोकरी करणे सर्वात सोपे जाते; कारण त्यांना इंग्रजीचे ज्ञानही असते. या सर्व कारणांमुळे भारतातील पांढरपेशा समाजाने इंग्रजी भाषा जाणीवपूर्वक आत्मसात केलेली दिसते.

खरी गोष्ट अशी की संगणकाची इंग्रजी भाषा ही आपल्याकडील मुलांच्या 'च'च्या भाषेसारखी आहे. ती मुळी इंग्रजी नाहीच ! आणि आताही मराठी लोकांनी संगणकासाठी मराठी भाषा वापरायचा पण केला तरी ती मराठी भाषाही ह्या 'च'च्या भाषेइतकीच मराठी होणार आहे. खरं पाहता संगणक हे आकडेमोडी करण्यासाठीचे यंत्र आहे. भाषा व संगणक यांचा अर्थाअर्थी काहीही संबंध नाही. ह्याच कारणामुळे ह्या यंत्राला 'संगणक' हे नाव दिले गेले. जरी संगणकाचा जन्म व्हायच्या आधी आजचा संगणक ज्या पद्धतीने काम करतो, ती पद्धत भाषेतून अर्थ काढण्यासाठीच वापरली गेली होती.

दुसऱ्या महायुद्धातला ऐन धुमश्चक्रीचा काळ. जर्मनीच्या सांकेतिक भाषेत पाठवल्या गेलेल्या गुप्त संदेशांचा अर्थ लावण्यासाठी ॲलन ट्यूरिंगने गणिती पद्धत वापरून सांकेतिक भाषेतली कुचकामी (निरर्थक) अक्षरे वगळून अर्थाची उकल केली. ॲलन ट्यूरिंगला संगणकाचा जनक म्हणतात ते उगाच नव्हे.

कॅल्क्युलेटरचा वापर करण्यासाठी इंग्रजी येणे आवश्यक आहे असा दावा कोणीही करत नाही. तर मग संगणकासाठीच हा दावा करण्याचे कारण काय ?

वस्तुतः कॅल्क्युलेटर व संगणक ह्यांच्या कामाची जातकुळी एकच आहे. दोघेही

केवळ आकडेमोडच करतात. कॅल्क्युलेटरची आकडेमोड ही साध्या हिशोबापुरती मर्यादित असते. त्यामानाने संगणक कैक पटीने गुंतागुंतीची आकडेमोड करू शकतो. अधिकाधिक गुंतागुंतीच्या प्रक्रिया संगणकाच्या आवाक्यात आणून तंत्रज्ञ संगणकाला अधिकाधिक बलवान करत आहेत.

आमच्या घरासमोरच्या रस्त्याच्या कडेला भाजी विकत बसणाऱ्या बाईकडे कॅल्क्युलेटर विकत घेण्याएवढे पैसे नक्कीच आहेत. पण ती आहे निरक्षर. तिला आकडे वाचता येत नाहीत, कॅल्क्युलेटर घेऊन ती काय करणार ? पण दिवसाकाठी शंभर गिऱ्हाइकांशी पैशाचे व्यवहार ती बिनबोभाट करते. आकडे तिला बघून ओळखता येत नसतील, पण ते तिने आपल्या डोक्यातच बसवून घेतले आहेत की काय कोण जाणे. गिऱ्हाइकाने भाजी घेतली तिचा दर काय, घेतलेल्या भाजीचे किती पैसे होतात, गिऱ्हाइकाने आपल्याला किती पैसे दिले  आणि आता आपण त्याला किती पैसे परत द्यायचे आहेत, हा हिशेब ती अगदी कॅल्क्युलेटरपेक्षा वेगाने मनातल्या मनातच करून टाकते, आणि व्यवहार पुरा करते. आकडे वाचता येत नसून आणि अक्षरशत्रू असून. अक्षरे तिच्या लेखी नाहीतच, पण आकड्यांना ती पुरती ओळखून आहे. तिला निरक्षर कसे म्हणणार ?

आकडे आणि अक्षरे यांची सांगड घालण्याचा पहिलावहिला प्रयत्न कॅल्क्युलेटरच्या आकड्यांच्या फलकावरून सहीसही उचलून घेतलेल्या टेलिफोनच्या तबकडीमधे उघडच दिसून येतो. ० ते ९ असे १० आकडे व A ते Z अशी २६ अक्षरे. एक आकडा सोडून दिला तरी प्रत्येक आकड्याला सरासरीने ३ अक्षरे. ती २७ होतात, म्हणून एका कुठल्यातरी आकड्याला दोनच अक्षरे दिली की काम झाले. मग संगणक बनवताना त्यांनी चक्क सर्व अक्षरांचा एक कळफलकच संगणकाला जोडून दिला. प्रत्येक रोमन अक्षराला त्यांनी एक ठरावीक आकडा दिला. त्यांचा क्रम अर्थातच अक्षरांच्या क्रमानुसार घेतला.'A'ला ६५ तर 'B'ला ६६ व 'Z'ला ९० असे आकडे देण्यात आले. म्हणजे कळफलकावरील 'A' ही कळ दाबल्याबरोबर संगणकाने आत ६५ ची नोंद करून ६ × ९ ठिपक्यांच्या रांगोळीमधले कोणते ठिपके उजळून काढून 'A' ही आकृती पडद्यावर दिसेल असे पाहिले. पडद्यावर दिसणाऱ्या 'A'शी भाषेचा अर्थाअर्थी काहीही संबंध नव्हता. संगणकासाठी तो केवळ एक आकड्यांचा खेळ होता.

जगभर लोकांच्या तोंडी हजारो भाषा आहेत. एका भाषेतील माणसाला त्याच भाषेतील माणसाशी बोलताना काहीच अडचण येत नाही. अडचण येते ती एका भाषिक गटातला माणूस दुसऱ्या भाषिक गटातल्या माणसाशी बोलण्याचा प्रयत्न करतो तेव्हा. हा म्हणजे बायबलमधल्या बेबल मनोऱ्यासारखा प्रसंग झाला.

परंतु ह्या सर्व गटातल्या सर्व माणसांना आकड्यांची भाषा मात्र सारख्याच प्रमाणात कळते. कारण आकड्यांची संकल्पना भाषेची सर्व बंधने ओलांडून जाणारी आहे. आकड्यांचा संचार अक्षरांपेक्षा सर्वगामी आहे. ह्याचा अर्थ अक्षरांना आकड्यांच्या स्वरूपात मांडता आले की झाले. ह्यासाठी कळफलक, CPU व पडदा ह्यांचा हा प्रपंच.

भाषेच्या ह्या लेखी रूपाच्याही आधी तिचे बोलले जाणारे रूप असते. भाषा म्हणजे जी बोलली जाते ती. बोलली गोष्ट विरून जाते. लिहून ठेवलेली कायम राहते. म्हणून त्या माध्यमाला आपण अ-क्षर म्हणतो. म्हणून भाषेची ही दोन्ही रूपे गणिती पद्धतीत बसवणे, एवढेच आपल्यासमोरचे आव्हान आहे. हेही आव्हान आपल्याला पेलवते की नाही एवढाच काय तो प्रश्न आहे.

मराठी लिहिण्याची सुरुवात संस्कृतमधील अक्षरे जशीच्या तशी उचलून झाली. २-४ हजार वर्षांच्या काळात संस्कृत किती लिप्यांमधून लिहिली जात होती ह्याची तर गणतीच नाही. आज जिचा देवनागरी म्हणून उदोउदो होतो ती लिपी हजारेक वर्षांपेक्षा जास्त जुनी नाही.

मुळात तोंडचे शब्द अक्षरबद्ध करायला सनातन्यांचा घोर विरोध होता. वेद लिहिले जाता कामा नयेत असा दंडकच होता. 'गुरुमुखी विद्या' हीच शिक्षणाची एकमेव प्रक्रिया होती. बुद्धानंतर व्यापारउदीम भरभराटीला आला आणि उधार-उसनवारीचे व्यवहार लिहून ठेवण्यावाचून गत्यंतरच नसल्यामुळे 'साक्षरता' रुजली. तरी भाषेचे बोलीपण सज्जड होते, व राहिलेही. 'एक गोष्ट प्रत्यक्षात अस्तित्वात आहे पण ती तद्दन खोटी आहे,' याचा दाखला म्हणून भारतीय दर्शनात नेहमी 'लिपी'चा उल्लेख करतात.

नागरी लिपीचा मोठ्या प्रमाणावर वापर होण्याचा प्रसंग येऊन ठेपला तो रामदेवराय यादवांच्या कारकिर्दीत सातेकशे वर्षांपूर्वी. त्यांनी मराठीचा वापर राज्य-कारभारची भाषा म्हणून करायचे ठरवले तेव्हा. हाती लिहून काढणे या कसोटीवरही देवनागरी उतरत नाही असे रामदेवरायांच्या अमात्याच्या - हेमाडपंतांच्या - ताबडतोब लक्षात आले आणि त्यांनी राज्यकारभारासाठी मोडीचा वापर सुरू केला. म्हणजे भाषा मराठी, लिपी फक्त मोडी. (बहुधा याच वेळी व्यंजन व स्वर मिळून होणाऱ्या अक्षरांचा तक्ता म्हणून बाराखडी रचली गेली असावी. हा आजही अगदी आदर्श तक्ता आहे. शिवाय तो सर्व भारतीय भाषांना लागू पडणारा आहे.) एक प्रकारे त्या काळातच मोडी लिपीने देवनागरीला मोडीत काढले होते. (गंमत म्हणजे १९६१ साली भाषिक पायावर महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आल्या आल्या महाराष्ट्र सरकारने मोडी

लिपीच मोडीत काढली व देवनागरीची पुन्हा प्रतिष्ठापना केली. ह्याच सुमारास अरब मंडळींनी सौदी अरेबियात अमेरिकन लोकांना कामाला लावून मोडीपेक्षा दसपटीने नागमोडी असलेली अरबी लिपी संगणकावर बसवून घेतली होती.) हेमाडपंतांपासून पेशवाईच्या अखेरपर्यंत म्हणजे सहाएकशे वर्षांपर्यंतचे ऐतिहासिक दस्तावेज मोडीत आहेत. (आता ही कागदपत्रे वाचू शकणारा मराठी माणूस दुर्मिळ झाला आहे.)

महाराष्ट्रातून पहिले मराठी पुस्तक प्रसिद्ध व्हायला पेशवाई बुडावी लागली. ब्रिटिश लोकांनी आल्या आल्याच छपाईचे तंत्रज्ञान भारतात रुजवले. भाषावार टंक पाडले. आपल्या समजुतीप्रमाणे लिपीचे घटक ठरवून त्याप्रमाणे टंक पाडले. इंग्रजी टंकांची केस १०० घरांची होती. २६-२६ बावन्न मूळाक्षरे, ० ते ९ हे १० आकडे व बाकी विरामचिन्हे वगैरे मिळून इंग्रजीचे १०० घरांत भागत असे. त्या मानाने मराठीसाठी किमान ३५० घरे असलेली टंकांची केस लागत असे. कारण यांचे मुळात १२ स्वर, ३६ मूळाक्षरे, परत १२ स्वरप्रतीके व अगणित जोडाक्षरे. यात इंग्रजीवरून जशीच्या तशी उचललेली विरामचिन्हेही आली.

हा बेसुमार खिळ्यांचा आकडा कमी करण्यासाठी मराठी लोकांनी काही कमी प्रयत्न केले नाहीत. ६ का होईना खिळे कमी होतात म्हणून स्वातंत्र्यवीर सावरकरांनी स्वर-व्यंजन वर्गवारीत गफलत करून 'इ ई उ ऊ ए ऐ' ऐवजी 'अि अी अु अू अे अै' असे लिहिण्याचा प्रस्ताव मांडला. संस्कृतच्या मूळाक्षरांमध्ये क च ट त प वर्गात ख घ छ झ वगैरे प्रत्येकी २ अक्षरे ही मूळच्या अक्षरात 'ह' मिळवून झालेली आहेत हे लक्षात घेऊन या 'ह' साठी एक वेगळी खूण '।' वापरली की एकदम १० अक्षरांची बचत करण्याचा प्रस्ताव विनोबांनी मांडला होता. (ही सूचना त्यांनी तमीळवरून उचलली होती की काय कोण जाणे. कारण तमीळमधील मूळाक्षरे ही त्या-त्या वर्गाचे पहिले अक्षर व अनुनासिक एवढ्यांनीच बनतात. 'क'चा उच्चार 'ख ग घ' केव्हा करायचा हे तमीळ मातृभाषा असलेल्याला आपोआपच समजते. त्यामुळे त्यांच्याकरिता वेगळी अक्षरे तयार करण्याची गरज त्यांना भासली नाही. नाहीतरी संस्कृतमध्येही 'क' चा 'ग' कधी होतो याचे नियम आहेतच. यावरून संस्कृतच्या मूळाक्षरांची वर्गवारीही तमीळवरूनच घेतली होती की काय अशी रास्त शंका येते.)

मराठीच्या ३५० घरी व्यापामुळे मराठीच्या एका फॉन्टच्या किमतीत इंग्रजीचे ४ फॉन्ट मिळून जात असत. ह्याचा परिणाम मराठी मजकुराच्या छपाईच्या दरावर अपरिहार्यपणे झालाच. खिळेजुळणीसाठी संगणकाच्या वापरानंतरही ही तफावत जशीच्या तशी राहिली आहे.

गमतीची गोष्ट म्हणजे खिळेजुळणी संगणकाच्या मदतीने होण्याची सुरुवातसुद्धा

एका ब्रिटिश बाईनेच केली. ह्यात देवनागरीचा क्रम मल्याळम व बंगालीनंतर तिसरा लागला. हा फोटोटाईप सेटिंगचा जमाना होता. पर्सनल संगणकांचा जमाना आल्यानंतर फोटोटाईपसेटिंगने डीटीपीचा अवतार घेतला.

ह्या स्थित्यंतरातदेखील हाताने खिळेजुळवणीच्या पद्धतीचीच री ओढली गेली. बायकोला दागिना घ्यावा त्याप्रमाणे डीटीपी मशीन्सचे पेव फुटले. ही मशीन्स चालवण्यासाठी वर्ड-प्रोसेसिंगच्या गुच्छांचा सुळसुळाट झालाच होता. ह्या वेगवेगळ्या गुच्छांमधे एकवाक्यता अजिबात नव्हती. एकाच्या संगणकावर तयार झालेला मजकूर दुसऱ्याकडचा संगणक वाचू शकत नाही (संज्ञापन तंत्रज्ञानाची ऐशी की तैशी !) अशी अवस्था होती आणि आजही आहे.

सुसूत्रता आणण्यासाठी IIT (कानपूर), C-DAC व TIFR (व नंतर NCST) ह्यांसारख्या अग्रणी संस्था या क्षेत्रात उतरल्या होत्या. त्यांनी आपापले तोडगे सुचवले होते. त्यांच्यापैकी एकाला सरकारी मान्यता मिळणार होती,ती C-DACच्या तोडग्याला मिळाली, आणि सर्व भारतीय भाषांकरिता ISCII चा तक्ता तयार झाला.१९८३मध्ये सुरवात झाल्यानंतर पहिल्यांदा १९८६ व त्यानंतर १९८८मध्ये असे अवघ्या ५ वर्षांच्या कालावधीत दोनदा फेरफारही केले गेले. जरूर पडल्यास तिसऱ्यांदाही फेरफार करू असे C-DAC चालवणारी मंडळी बिनधास्तपणे सांगतात. कोड कशाशी खातात हे माहीत नसल्याचीच ही निशाणी होय.

आजही त्यांच्या कोडमध्ये ८-१० कुचकामी कोड्स आहेत. आणि यांच्या हाती सर्व भारतीय भाषांच्या संगणकीकरणाचे भवितव्य सोपविण्यात आले आहे. यांच्या वरिष्ठ मंडळींची तर अशी समजूत ('ऑफ द रेकॉर्ड' का होईना) की आणखी १५-२० वर्षांनी या भारतीय भाषा थोड्याच तगून राहणार आहेत. त्यांची जागा एक ना एक दिवस इंग्रजी घेणारच. जगातल्या इतर लोकांची मात्र अशी समजूत नाही. इंटरनेटच्या प्रादुर्भावानंतर समान मातृभाषा असलेली जगाच्या दोन टोकांना राहणारी दोन माणसे ही आपल्या भाषेतच एकमेकांशी इलेक्ट्रॉनिक पत्रव्यवहार करणे पसंत करतील असे जगातल्या इतर मंडळींना वाटते. म्हणूनच त्यांनी जगातल्या यच्चयावत् भाषांच्या चिन्हांची एक टोलेजंग इमारत उभी करण्याचा चंग बांधला आहे. त्यातही आजसुद्धा भारतीय भाषांच्या लिप्यांचा अंतर्भाव करण्याचे घोंगडे २००० सालापासून भिजत पडले आहे.

दरम्यान मराठी वर्ड-प्रोसेसिंग बनवणाऱ्यांचा धुमाकूळ अव्याहत चालू आहे. मुळात हे वर्ड-प्रोसेसर्स नसून केवळ लेटर-प्रोसेसर्स आहेत. किंबहुना यांना लेटर-प्रोसेसर्ससुद्धा म्हणणे अवघड आहे. कारण एक अक्षर नेमके कशाचे बनते याची युक्ती

त्यांना संगणकामध्ये घालता आलेली नाही. उदाहरणार्थ, 'फक्त' हा शब्द लिहिताना ओळीच्या शेवटी येऊन मावेनासा झाला तर संगणक स्वतःचे डोके चालवून तो 'क' व 'त' यांच्या मध्येही तोडून मोकळा होऊ शकतो. ही उणीव लपविण्यासाठी मराठीतल्या कोणत्याही पॅकेजमध्ये शब्द तोडायची सोयच नाही.

मशीन हायफनेशनची तरतूद करायची तर शब्द कुठे तोडायचा त्याचे लॉजिक व त्याच्याही आधी एकेक अक्षर कसे बनते त्याची प्रक्रिया संगणकाला समजावून सांगणे आवश्यक आहे. हे त्यांनी केलेले नसल्यामुळे संगणकावर जुळणी होणाऱ्या सर्व मराठी वर्तमानपत्रांना रोजच्या अंकात सरासरीने ५ ते १०% वाया घालवावी लागत आहे.

आता या प्रत्येक वर्तमानपत्राची आपली इंटरनेट - आवृत्ती आहे. ही मराठी वाचकाला अपूर्वाई आहे. तुम्ही तारीख सांगितल्याबरोबर त्या तारखेचा अंक तुमच्या दिमतीला उभा राहतो. पण तुम्हाला तुमच्या इस्लामपूर गावाची हालहवाल जाणून घ्यायची असेल तर ती मात्र ही वेबसाईट तुमच्यासमोर हजर करू शकत नाही. कारण तिला 'इस्लामपूर' या नावावरून काहीच अर्थबोध होत नाही. एवढेच काय पण अशा तऱ्हेची चौकशी करण्याची मुभाही त्यात तुमच्यासाठी ठेवलेली नसते. थोडक्यात म्हणजे या वेबसाईट्स इंटरॅक्टिव्ह नाहीत. कारण तुमच्यासमोर हजर केलेले वर्तमानपत्र 'हायपरटेक्स्ट' मोडमध्ये असते. संगणक त्याला अक्षरांचा मजकूर म्हणून ओळखत नाही. एखादे मूल सेन्सिटिव्ह असले तर त्याचे मोठे कौतुक होते. पण ते जर का हायपरसेन्सिटिव्ह असेल तर तो आजार समजला जातो. इंग्रजीसमोर मराठीची नेमकी हीच अवस्था आहे.

इंटरनेटने अंतरे कापूनच काढली आहेत. जगातल्या दोन टोकांची एकत्र गठडी वळलेली आहे. मात्र हे आमच्या वर्ड-प्रोसेसर्सना लागू नाही. इनपुट करणारा व आउटपुट घेणारा एकच असतो तोवरच यांची सिस्टीम चालते. मात्र इनपुट करणारा पुण्यात व आउटपुट घेणारा न्यूयॉर्क तर दूरच इथे लोणावळ्यातच असला तरी यांची सिस्टिम पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणे कोलमडून पडते. यांच्यासाठी इलेक्ट्रॉनिक्स्ने अंतरे कापून काढलेलीच नाहीत.

मुळात या गोष्टींची त्यांच्याकडून अपेक्षा करणेच चूक होते. कारण अक्षरांची कोड्स वर्णमालेच्या क्रमानुसार द्यायलाच त्यांना १९९३ साल उजाडावे लागले होते. आपल्या भाषेचे गाठोडे बांधता बांधताच त्यांची दमछाक होते. ते गाठोडे वाहून नेण्याचे बळ तर त्यांच्यात नाहीच. म्हणून हे गाठोडे कोणाच्या तरी डोक्यावर देण्यासाठी धडपड. 'आमचे पॅकेज विंडोजशी कंपॅटिबल आहे' अशी जाहिरात. ती म्हणजे विंडोजने यांना

डबलसीट नेण्याचाच प्रकार. त्याचीसुद्धा हे फुशारकी मारतात.

मराठी ही देशातली एकमेव भाषा आहे जिथे अक्षरओळख करून देणाऱ्या पुस्तकाला 'अंकलिपी' असे नाव आहे. संगणकाचे यच्चयावत् व्यवहार या 'अंक'-लिपीतच चालतात. म्हणून आपल्या देशात हे काम करण्याची जबाबदारी मराठी लोकांवर येऊन पडते. त्यांना स्वतःच्या भाषेबद्दल किती आस्था आहे त्यावर हे काम त्यांच्या हातून पुरे होण्याची शक्यता अवलंबून आहे.

ITच्या बळावर परदेशी जाणाऱ्या मंडळींचे प्रमाण भारतातील इतर कोणत्याही शहरापेक्षा पुण्यातून प्रचंड जास्त आहे. नाना कारणांनी का होईना पुण्यात बोलली-लिहिली जाणारी मराठी ही 'प्रमाण' भाषेचे स्थान पटकावून आहे. तेव्हा संगणक आणि मराठी यांची सांगड घालून देण्याची जबाबदारी स्वाभाविकपणेच पुणेकरांच्या डोक्यावर येऊन पडते.

पुण्यातली अग्रगण्य संस्था म्हणून अर्थात् पुणे विद्यापीठावर पण. स्वातंत्र्यानंतर केंद्र सरकारच्या वादग्रस्त शैक्षणिक धोरणांमुळे विद्यापीठांच्या डोक्यावरून जाऊन IIT, TIFR, BARC, NCL, NPL वगैरे अनेक संस्था सरकारी पुढाकाराने काढल्या गेल्या, आणि संशोधनाची बाब त्यांना बहाल करण्यात आली. विद्यापीठात चालत आलेली शिक्षण आणि संशोधनाच्या अन्योन्य संबंधाची परंपरा खंडित झाली. विद्यापीठांतले संशोधनकार्य बंदच पडल्यागत झाले. शिकवावे आणि परीक्षा घेऊन निकाल लावावेत एवढेच काम विद्यापीठांना उरले. पुणे विद्यापीठ याच वातावरणात लहानाचे मोठे झाले.

पण तरी विद्यापीठांना संशोधन करायला मनाई तरी नाहीच. मराठीवर आधारित चलन-प्रणालीच्या या प्रकल्पाने त्याचा श्रीगणेशा होऊ शकतो.

पुणे विद्यापीठाच्या गणित विभागात अ.भि.शहा नावाचे गृहस्थ काही वर्षांपूर्वी शिकवत असत. विद्यापीठातून बाहेर पडल्यानंतर लिहिलेल्या त्यांच्या 'ॲन आयडिया ऑफ ए युनिव्हर्सिटी' ह्या लेखात त्यांनी गणित हा विषय थेट शाळांपासूनच्या अभ्यासक्रमांतून काढून टाकण्याची सूचना केली होती. गणिताच्या नावाखाली सर्वत्र निव्वळ आकडेमोडीचे जंजाळ विद्यार्थ्यांच्या डोक्यावर मारले जाते असा त्यांचा अनुभव होता. गणिताऐवजी तर्कशास्त्र हा विषय शिकवावा, तोच गणिताचा गाभा आहे असे त्यांचे भक्कम प्रतिपादन होते. देशातल्या कोणत्याच विद्यापीठाने त्यांच्या ह्या सूचनेकडे लक्ष दिले नाही हे उघड आहे. गणित तर सोडा पण संगणक विभागाच्या जागी सायबर्नेटिक्स विभाग खोलण्याचे अद्याप विद्यापीठाशी संबंधित असलेल्या कोणाच्याच डोक्यात आल्याचे दिसत नाही.

मराठी चलन-प्रणाली बांधण्याच्या प्रकल्पाचा एखादा आराखडा इथे सादर

करण्याचे उद्दिष्ट अर्थातच नव्हते. या क्षेत्रात आजवर काय काय झाले आहे, त्यात कोणत्या कमतरता आढळतात, त्यामुळे काय सावळा गोंधळ माजलेला आहे - हे सगळे उघड्या डोळ्यांनी पाहण्याचे धाडसच तेवढे इथे केले आहे. प्रश्न जास्तीत जास्त स्वच्छपणे मांडता आला तर उत्तर आपोआप उघड होते अशी धारणा आहे. त्या दृष्टीने प्रश्नांची मांडणी करण्याचा हा प्रयत्न आहे एवढेच.

ही मांडणी जाणूनबुजूनच पंडिती केलेली नाही. कारण मुळात हे सगळे कामच भाषेच्या सगळ्या व्यवहाराप्रमाणे प्रचंड गुंतागुंतीचे, आजच्या मराठीत सांगायचे तर बहुपरिमाणी आहे. त्यातून वाट काढण्याचा प्रयत्न हा म्हणूनच बहुज्ञानशाखीय होणे भागच आहे.

इथे आम्ही पायाखाली वीटच फक्त ठेवली आहे. तिच्यावर विठोबाला उभे करायची धमक असलेल्यांनी आता पुढे यावे.

*[टीप :पुणे विद्यापीठाच्या संख्याशास्त्र विभागात सादर करण्यात आलेला निबंध, १४ ऑगस्ट २००३]* ■

५, वृंदावन, २-बी, रहेजा टाऊनशिप, मालाड (पूर्व) मुंबई ४०००९७

## भिजकी वही

अरुण कोलटकरांच्या 'भिजकी वही' या कवितासंग्रहातील पात्रं त्यांनी मिथक किंवा प्राक्कथांमधून, लोककथांमधून आणि समकालीन घडामोडींतून घेतलेली आहेत. ही पात्रं आपल्याशी संवाद साधू इच्छितात किंवा इतर पात्रांशी बोलताना दिसतात. रोजच्या किंवा व्यवहारभाषेत संभाषण करणाऱ्या व्यक्तींशी आपली भेट होते. त्यांची बोलण्याची पद्धत, आवाजातले चढउतार, हावभाव, हातवारे, एवढेच काय त्यांची एकूणच देहबोली आपल्याला दिसू लागते. मुद्रित मजकूर वाचताना आपण तो सतत ऐकतही आहोत असा अनुभव आपल्याला येतो.

समकालीन मराठी बोलीच्या अगदी जवळ जाणाऱ्या, तिला अतिशय कल्पकतेने संपादित करणाऱ्या, तिची स्वाभाविक व्यक्तिविशिष्ट लय पकडणाऱ्या, संभाषणातील सहजता, उत्स्फूर्तता आणि कल्पकता जपणाऱ्या आणि म्हणून उत्कट नाट्यात्म अनुभव देणाऱ्या कविता, असे या संग्रहातील कवितांचे वर्णन करता येईल. ■

**रविंद्र किंबहुने,** "अभिधानंतर", जानेवारी ते जून २००४, पृ. १९.

# नवे पारिभाषिक शब्द

द. पां. बुरटे

परभाषेतील ज्ञान स्वभाषेत आणताना पारिभाषिक शब्द उभे करण्यासंबंधी धोरण काय असावे याचा इथे विचार करायचा आहे.

काही करण्यापूर्वी उद्दिष्टाची स्पष्ट कल्पना हवी. इथे 'ज्ञानविषय अधिक सहज समजावा' हेच आपले उद्दिष्ट असते असे मला वाटते. तसेच हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी विषय मातृभाषेतून शिकविणे उपयुक्त ठरेल असेही आपल्याला वाटते. परभाषेतील ज्ञान स्वभाषेत आणण्याचा प्रपंच केवळ याच कारणासाठी असतो असे वाटते.

विषय स्वभाषेतून अधिक सहज समजतो असे आपल्याला का वाटते ते पाहू. मूल जन्मल्यापासून अतिशय अधाशीपणाने शिकत असते. हे प्रत्यक्ष जीवनातून मिळणारे शिक्षण असते व ते पुढेही आपण आयुष्यभर घेत असतो. या नैसर्गिक पद्धतीने औपचारिक शिक्षणापूर्वीच प्रचंड प्रमाणात शिक्षण झालेले असते. यातून मिळालेले ज्ञान हाच पुढील औपचारिक शिक्षणाचा आधार असतो. ज्ञाताकडून ज्ञानाकडे हे तिथे सूत्रच आहे. या ज्ञानावरील भाषिक पकड ज्या भाषेतून असते ती मातृभाषा किंवा स्वभाषा. या प्रचंड ज्ञानाधारावरील विलक्षण पकड हे मातृभाषेचे मोठेच सामर्थ्य असते. अल्लादीनचा दिवा घासावा तसे मातृभाषेतील शब्द उच्चारावा आणि ती संकल्पना पंचेंद्रियांपुढे ठाकावी हे तिचे सामर्थ्य विषय सहज समजण्याला कारण असते.

तथापि उच्चारताच अर्थाचा उजेड पाडणारे दिव्यासारखे शब्द उभे करणे हे शिवधनुष्य पेलण्यासारखे आहे. हे गांभीर्याने व नम्रतेने करायचे काम आहे. इथे शाब्दिक भाषांतराचा मोह होतो. ते सोपे असते. पण असले जवळचे मार्ग विषय अधिक अवघड करतात, सोपा नाही. इथे परभाषेतील शब्द ज्या संकल्पनेचा वाचक आहे ती संकल्पना सहज व्यक्त करू शकेल असा शब्द स्वभाषेत उभा करायचा असतो. यासाठी लक्ष शब्दावरून संकल्पनेवर नेऊन तिचेवर स्थिर केले पाहिजे. ती नीट समजून घेतली पाहिजे. म्हणजे ती अधिकाधिक स्पष्ट व सुटी दिसत गेली पाहिजे. तिच्याकडे विविध संदर्भांत पाहात गेल्यास हे साध्य होईल असे वाटते. किती स्पष्ट व किती सुटी याला अंत नाही. पण यात कुचराई केल्यास पुढे अति किंवा मित व्याप्तीच्या दोषाचे धनी

व्हावे लागेल.

मनात संकल्पना स्पष्ट व सुटी झाल्यावर तिच्यासाठी शब्द शोधायचा. मनातले शब्दात येते ते प्रतिभेमुळेच. तेव्हा हे काम प्रतिभेचेच. शब्द सोन्यासारखा हवा. गाण्यात सूर व विषयनिरूपणात शब्द सच्चे आणि सहज लागले पाहिजेत. एरवी हा व्यापार अव्यापारेषु ठरेल. म्हणून इथे प्रतिभा इरेला घातली पाहिजे. प्रयत्न निकराचा हवा. 'हिताकारणे सर्व शोधोनि पाहे', हे रामदासांचे वचन इथे स्मरले पाहिजे.

आता परभाषेतील सगळ्याच संकल्पना काही नव्या असणार नाहीत. काही भले लगेच ओळखू न येवोत, पण संकल्पनांची समज अधिकाधिक स्पष्ट व सुटी होत जाईल तसे त्या ओळखू येत जातील. बरे, संकल्पना असेल तर आपल्याकडे शब्दही असेलच. असा शब्द ही फारच भली गोष्ट होय. स्वभाषकांना त्याच्या केवळ योजनेने संकल्पनाच तत्काळ समजेल. पुढे स्पष्टीकरणही नको असे होईल. किंबहुना, परभाषेतूनही जे न समजावे तेही अशा शब्दांची केवळ योजना समजावू शकेल. उदाहरणार्थ, ज्याला इंग्रजीत 'मास स्पेक्ट्रोस्कोप' म्हणतात ती, आपला शेतकरी जिला उफण म्हणतो तीच गोष्ट आहे किंवा संगणकाच्या संदर्भातील 'अल्गॉरिदम' म्हणजे गणित सोडविण्याच्या संदर्भात आपण ज्याला रीत म्हणतो, तीच गोष्ट आहे असे माझे म्हणणे आहे. हे खरे असेल तर केवळ या शब्दांच्या योजनेमुळे त्या संकल्पना समजल्या असे होणार नाही काय ?

आता परभाषेतील संकल्पना खरेच नवीही असेल. ती कदाचित तिच्या वाचक असलेल्या परभाषेतील शब्दासह आधीच स्वभाषेत दाखल झाली असेल. तसे असेल तर यामुळे भाषा दूषित झाली म्हणावे की समृद्ध म्हणावे हे प्रथम ठरविले पाहिजे. मराठी मुलुखात गावोगाव बस आली. बसबरोबर कंडक्टर आला. ड्रायव्हर आला. त्यांचे वाचक शब्द आले. आपोआप. जे असे आपोआप आपले झाले त्यांना परके मानू लागू तर ओंजळीत कितीसे उरेल? समजा परभाषेतील संकल्पना नवी आहे, हवीही आहे पण अजून रुजायची आहे. तिला स्वभाषेत शब्द तयार असा अर्थात नाही. इथे तिचा वाचक असलेला परभाषेतील शब्दच घ्यावा की तिच्यासाठी नवा शब्द घडवावा याबद्दल काय धोरणे असावे ? वस्तू किंवा संकल्पना घडताघडताच त्यांच्यासाठी शब्दही बहुधा तिथेच तेथील भाषेत घडत असतात. हाच त्या शब्दांचा इतिहासही असतो. त्या वस्तू, संकल्पना यांच्याबरोबरच त्यांच्यासाठीच्या शब्दांचाही संचार व स्वीकार होत जातो. त्या शब्दांना इतिहासाबरोबर या व्यापक स्वीकाराचेही समर्थन लाभलेले असते. त्यांच्या स्वीकारामुळे त्या इतर भाषाही दूषित नव्हे तर समृद्धच होतात असे दिसते. हे जरे खरे असेल तर आपण तसेच करण्यात काय अडचण

आहे ? बरे असे करणे आपल्याला नवीन आहे असेही दिसत नाही. वर 'बस', 'कंडक्टर' वगैरे शब्दांची उदाहरणे आलीच आहेत. अरबी, फारशी, पोर्तुगीज इंग्रजी अशा कितीक भाषांतून इथे शब्द आले आहेत. संकल्पना थोडीशीही नवी असली तरी ती शब्दासह आली आहे. मराठीत वहाणा, जोडे, खडावा, पादुका, पादत्राणे असे विविध शब्द असताना बूट, चपला या त्याच प्रकारातल्या वस्तू मूळ शब्द घेऊनच आल्या आहेत. यावरून मराठीची दारे व खिडक्या उघड्या आहेत असेच दिसते. कदाचित म्हणूनही मराठी रसरशीत आहे.

असे जरी असले तरी इथे एक गोष्ट नमूद केली पाहिजे की कधी कधी ही परिस्थिती एक संधीही असते. अर्थात संकल्पनेचे नाव म्हणून येणाऱ्यांच्या बाबत नव्या शब्दाला वावच दिसत नाही. अगदी हाती कथलाचा वाळा असला तरीदेखील आपण सोनूबाईला कथलाबाई म्हणत नाही. तथापि नव्या संकल्पनेसाठी अर्थाचा पटकन उजेड पाडील असा किंवा कधी वर्णनात्मक असलेल्या मूळ शब्दाहूनही अधिक योग्य व अधिक अर्थवाही शब्दही घडविता येणे अशक्य नाही. उदाहरणार्थ 'स्पेक्ट्रम' हा शब्द प्रकाशाच्या संदर्भात सार्थ असला तरी वस्तुमानाच्या संदर्भात योग्य वाटत नाही. मात्र दोन्हींसाठी मराठीत 'पाखड' तसेच तर्कशास्त्रात 'प्रेडिकेट'साठी 'रिक्तपदविधान' तसेच फिनॉमेनॉलॉजीमधील 'ब्रॅकेटिंग'साठी 'उपेक्षा' हे शब्द सुचवावेसे वाटतात. तसेच 'हार्ड वॉटर'साठी 'कठीण पाणी' हा शब्द वापरून पुढे मग कठीण पाण्याला फेस कमी येतो असे प्रतिपादन करण्यापेक्षा तशा पाण्याला 'कमी फेसाचे' किंवा 'बिन-फेसा'चे (संस्कृतात हवे तर 'मितफेन' अथवा 'फेनशून्य') पाणी म्हणणे अधिक योग्य वाटते. ही उदाहरणे आहेत. शब्द सुचविणे हा इथे हेतू नाही तर विषय अधिक सहज समजावा या उद्दिष्टासाठी काही करण्याची इथे असलेली संधी निर्देशित करायची आहे.

नवे शब्द घडविण्याची मराठीची कुवत तुटपुंजी आहे असा माझा समज आहे. तो गैर आहे असे कोणीतरी मला दाखवून दिल्यास मला आनंद होईल. त्यासाठी आपण सहजच संस्कृतकडे वळतो. संस्कृतचे शब्दनिष्पत्तीचे सामर्थ्य मोठे आहे. या सामर्थ्याचे मर्म तिच्या व्याकरणात आहे. भले मराठी असो वा संस्कृत, भाषा, तिच्या लकबी, तिचे व्याकरण, त्यातील शब्दांना आधीपासून असलेले अर्थ नीट जाणण्याचे पथ्य पाळावे. एरवी तो फुटक्या नावेतून नदी ओलांडू पाहण्याचा प्रकार होईल. आधुनिक विज्ञानशाखांना आज महत्त्व आहे. पण त्या शाखांच्या अभ्यासकांची भाषांबद्दलची आस्था कमी दिसते. ही बाब पारिभाषिक शब्द उभे करण्याच्या दृष्टीने चिंताजनकच म्हणावी लागेल. यापुढे जाऊन धोरणात्मक कारणाने किंवा स्वभाषेच्या आग्रहापोटी किंवा अनास्थेपोटी भाषांचा अनादर करणे हे तर जिचा आधार घ्यायचा

त्या होडीवर कुऱ्हाड चालविल्यासारखेच होईल, असे वाटते. हे टाळावे. दुसरे पथ्य स्वभाषेशी संबंधित असलेल्या भाषांच्या संदर्भात आहे. भारतीय भाषा एकमेकींना जवळच्या आहेत. त्यांचे एकमेकींशी देणेघेणे आहे. त्यांना एकमेकींचा आधार आहे. तसेच त्यांचे संस्कृतशी घट्ट नाते आहे. संस्कृतचा अनादर हा त्यांचाही अनादर होय. कोणत्याही भारतीय भाषेने एरवीही आणि विशेषतः संस्कृतच्या आधाराने नवे शब्द सिद्ध करताना अन्य भारतीय भाषांशी ताळमेळ राखावा. एकमेकींचा आदर करावा. एकमेकींच्या अनुभवाचा फायदा घ्यावा. असे करीत घडविलेल्या शब्दांना निदान भारतात तरी विस्तृत स्वीकार लाभेल असे करावे. त्यामुळे त्यांचे सामर्थ्य वाढेल.

या क्षेत्रात बरेच काही चांगले घडत असले तरी सारेच अलबेल नाही. भारतातील काही आग्रही लोकांचा, एके काळी राजभाषा असलेल्या इंग्रजी व उर्दू या भाषांना विरोध असतो. त्या भाषांतील शब्द हटवले पाहिजेत अशी निकड त्यांना वाटते. याच्या मुळाशी मुख्यतः भाषिक अहंकार आहे असे मला वाटते. अहंकार कोणाच्या तरी विरोधातच असतो. विरोध एकतर असूयेपोटी असतो किंवा तुच्छतेपोटी. इथे भय असते. कोणाला तरी हरवायचे असते. कोणाला तरी नष्ट करून दाखवायचे असते. आपली भाषा लादायची असते. थांबविल्याशिवाय ही खुमखुमी थांबत नाही. तमिळांना हिंदीविरोधात प्रखर आंदोलन करावे लागले. उर्दू लादण्याच्या प्रयत्नापोटी एके काळचा पूर्व पाकिस्तान भयंकर रीतीने संपला. हा ताजा इतिहास आहे. पण त्याकडे पाहण्याचा शहाणपणा हवा.

अहंकाराचे ठिकाणी स्वभाषेचीही कदर नसते. मग जिचा अभिमान बाळगायचा त्या संस्कृतची व इतर भाषाभगिनींची काय कथा ? इथे धीर नसतो, घाई असते. संस्कृतच्या वृथा अभिमानाला तिच्या ज्ञानाची जोड नसते. अहंकाराला कसल्याही ज्ञानाचे महत्त्वही नसते. कोणीतरी 'माहिती'ला 'सूचना', 'विनंतीला' 'निवेदन', 'अर्जाला' 'आवेदन', 'समाप्तला' 'संपन्न', 'विरोधा'ला 'विरोधाभास', 'क्वोटेशन'साठी 'बोली'ऐवजी 'निविदा', 'व्हिजिटर'साठी 'अभ्यागत'ऐवजी 'आगंतुक' वगैरे शब्द ठरवून टाकले. कामात मग्न असणे म्हणजे व्यस्त असे ठरविले. जबरदस्तीने ठोकलेल्या या निवेदन, सूचना वगैरे शब्दांचे भगवान पाणिनीपासून मानले गेलेले किंवा रूढ झालेले अर्थ देशोधडीला लावण्याचा हा खटाटोप आहे. ते अर्थ यापुढे कसे व्यक्त करावे, हे एखादी समिती नेमून आम्हाला सांगा असे 'निवेदन' घेऊन लोकांना सरकारदरबारी खेटे घालायला लावायचे आहेत काय ? बरे, या देशातील इतर भाषांशी ताळमेळ पहावा तर अंतर्देशीय व आंतरदेशीय या शब्दांचे हिंदीतले अर्थ मराठीतील अर्थांच्या उलट आहेत असे मुंबईतील विमानतळांवरील पाट्या वाचून

वाटते. हिंदीतल्या चुकीची आपण इथे नक्कल केलेली नाही. हे सावधपण नेहमी हवे. मराठी विश्वकोशात ऑप्टिममला पर्याप्त का म्हटलेले आहे हे कळत नाही. अखेरीस, एखाद्या नव्या संकल्पनेसाठी वरील पथ्ये पाळून शब्द उभा करता आला नाही तर एक दीर्घ श्वास घेऊन पुढे जावे. सारे आपल्या मनासारखेच नेहमी कसे होईल ?

सारांशाने, स्वभाषेत पारिभाषिक शब्द उभे करण्यासाठी पुढील धोरणे या लेखात सुचविली आहेत : विषय अधिक सहज समजावा हा इथे हेतु असावा. तो नजरेआड होता कामा नये. संकल्पना तत्काळ समोर उभी करतील, विषय अधिक सोपा करतील असे स्वभाषिक शब्द प्रयत्नाने शोधावे किंवा काही पथ्ये कटाक्षाने पाळून घडवावे. पण ते शक्य न झाल्यास स्वभाषेचा हट्ट धरू नये. अनमान न करता परभाषेतील मूळ शब्दांना येऊ द्यावे. विषय समजण्यात पारिभाषिक शब्दांमुळे सोय झाली नाही तरी एकवेळ चालेल पण कधीही त्यांचा अडथळा मात्र होता नये. ■

**ब-४, बाणगंगा सहकारी गृहसंस्था, गोवंडी स्थानक मार्ग, देवनार, मुंबई ४०००८८**

## बंगाली चालणार नाही !

पश्चिम बंगालचे नवे राज्यपाल गोपाळ कृष्ण गांधी यांनी १४ डिसेंबर २००४ रोजी आपल्या पदाची शपथ घेतली, त्या वेळी घडलेला हा किस्सा आहे. तो 'इंडियन एक्स्प्रेस'च्या २० डिसेंबर २००४च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे.

गोपाळ कृष्ण गांधी हे महात्मा गांधींचे नातू. त्यांना आपल्या पदाची शपथ बंगालीमधून घ्यायची होती. पश्चिम बंगालचे मुख्य सचिव श्री. अशोक गुप्ता यांना त्यांनी तसे कळवले. पण कलकत्ता उच्च न्यायालयाचे प्रभारी मुख्य न्यायाधीश श्री. अजय नाथ रॉय यांनी त्याला आक्षेप घेतला. तेच गांधींना पदाची शपथ देणार होते ना !

बंगालचे कायदा व न्यायमंत्री श्री. निशीथ रॉय यांनी हा विषय न्यायमूर्ती रॉय यांच्याकडे काढताच ते म्हणाले, ''भारतीय राज्यघटनेची भाषा इंग्रजी आहे आणि हिंदी ही राजभाषा आहे. म्हणून शपथ घेण्यासाठी त्या भाषा चालतील, पण बंगालीला मी परवानगी देऊ शकत नाही.''

''राज्यघटनेचे बंगालीसह सर्व भारतीय भाषांत भाषांतर झाले आहे'' असे मंत्रीमहोदयांनी न्यायमूर्तींच्या निदर्शनास आणून दिले, तेव्हा न्यायमूर्तींनी माघार घेतली. पण ते म्हणाले, ''हरकत नाही, पण कुणी न्यायालयात जनहित याचिका दाखल केली तर याची जबाबदारी मी घेणार नाही.''

शेवटी, सरकारला कोणताही धोका पत्करायचा नसल्यामुळे गांधींना इंग्रजीतल्या शपथेवर समाधान मानावे लागले. (अखेरीस, जनहित-याचिकेचाही निकाल न्यायमूर्तींच्याच हातात राहिला असता ना !)

# गणिका आणि राउवा

मा. ना. आचार्य

शोधाचे निमित्त ठरलेली ओवी अशी -

*तूतें आराधितां नाइकें । होतीं राउवें बोलाविति कवतिकें ।*
*तिये वैकुंठीं तुवां गणिके । सुरवाडु केला ॥*

(ज्ञानदेवी - राजवाडे संहिता - ११.१०७ मुंबई विद्यापीठ प्रत)

[= तुसी आराधना करणे ऐकत नव्हती, परंतु आपल्या (पाळलेल्या) राघूकरवी कौतुकाने ती (तुसे नाव) वदवून घेत होती. त्या वेश्येला तू वैकुंठात (सुखाची) लयलूट करून दिलीस.]

ओवीचा संदर्भ असा - विश्वरूपदर्शनार्थ अर्जुन कृष्णाची मनधरणी करीत आहे. भक्तांवर कृपा करण्याच्या बाबतीतली देवाची उदारता सांगताना ज्ञानदेवांनी अर्जुनमुखी अनेक पौराणिक दृष्टान्त दिले आहेत. जसे - पूतना, शिशुपाल, ध्रुव, अजामीळ, भृगू, शंखासुर व बळी. त्यांतच वरील गणिकेच्या दृष्टान्ताची भर घातलेली आहे.

ही गणिकेची कथा कुठल्या पुराणात आहे ? याबाबत ज्ञानदेवीचे संपादक व अभ्यासक यांची मते जाणून घेण्याचा हा एक प्रयत्न आहे.

त्यासाठी प्रथम या ओवीचा अन्य पाठ अर्थासह नोंदून ठेवतो.

*'तूतें आराधी ना आयके । होती पुंसा बोलाविन कौतुकें ।*
*तिथे वैकुंठीं तुवां गणिके । सुरवाडु केला ॥'*

(११.१०७ - दांडेकर प्रत - १९५३)

दांडेकरांनी दिलेला अर्थ असा -

''तुझे गुणवर्णन कधी ऐकले नाही व जी गणिका मरतेवेळी सहज आपल्या पाळलेल्या राघूस 'राघोबा, राघोबा' म्हणून हाक मारीत होती. त्या गणिकेस त्वां वैकुंठामध्ये सुख दिलेस.''

येथे 'राउवें' ऐवजी 'पुंसा' असा महत्त्वाचा पाठभेद आहे. बाकी पाठभेद भावार्थाच्या दृष्टीने दुर्लक्षणीय आहेत.'राउव' व 'पूंस' दोन्हींचा अर्थ 'राघू, पोपट' असाच आहे. त्यामुळे या महत्त्वाच्या म्हणून मानलेल्या पाठभेदाची शोधोद्योगात अडचण येणार नाही. ('पूंस' हा शब्द 'शेपटी' या अर्थी, ज्ञानदेवी १३.७२८मध्ये येतो.)

दांडेकरांनी परिशिष्टामध्ये काही पौराणिक कथानके दिली आहेत. मात्र त्यांत उपरोक्त 'गणिका-राघू'चे कथानक दिलेले नाही.

साखरे प्रतीतही शेवटी काही कथानके दिलेली आहेत. त्यांत मात्र उपरोक्त ओवीच्या संदर्भात भागवताच्या अकराव्या स्कंधातील आठव्या अध्यायातील प्रसिद्ध 'पिंगले'ची कथा दिलेली आहे. (या कथेची ओळख पुढे यथास्थल येणारच आहे.) तिला ते पुढील जोड देतात - 'या पिंगलेने एक पोपट पाळला होता. त्यास तिने 'विठ्ठल, विठ्ठल, राम, राम' असे बोलावयास शिकविले. मरणसमयी ती पोपटास 'बोल विठ्ठल विठ्ठल' म्हणून बोलावीत होती. तिला सद्‌गती प्राप्त झाली व अंतकाळी पोपटाच्या निमित्तेकरून रामनाम मुखात आल्यामुळे तिला वैकुंठलोक प्राप्त झाला.' (१९७२ची प्रत, पृ. १०७१)

आगाशे (श्री ज्ञानेश्वरी टीका - १९२४) यांच्या प्रतीत राजवाडे - पाठ अनुसरलेला आहे. त्यामुळे तेथे 'राउवें' असाच पाठ येतो. मात्र प्रस्तुत दृष्टांत कथेविषयी ते म्हणतात, 'ही वेश्येची कथा पुराणांतरी कोठे आहे, हे आम्हास माहीत नाही. पण आनंदतनयाने केलेले श्लोकवृत्तातील एक आख्यान मात्र आमच्या पाहण्यात आले आहे.' (पहा - 'आनंदतनयकृत कवितासंग्रह', पान ५५)

'आनंदतनय' हे कर्नाटकातील 'अरणी' गावचे देशपांडे. यांचा काळ स्थूलपणे इ.स. १७वे शतक - उत्तरार्ध. यांची काव्यरचना प्रामुख्याने आख्यानपर आहे. त्यांच्या नावावर एकूण वीस आख्याने व १७० पदे मिळतात. जनार्दन बाळाजी मोडक व वामन दाजी ओक यांनी 'आनंदतनयकृत कवितासंग्रह' या नावे त्यांची कविता इ.स. १८९१मध्ये प्रसिद्ध केली आहे. परंतु आता हा संग्रह अत्यंत दुर्मीळ झाला आहे. या कवितासंग्रहाच्या संपादकांनी कुठेही या आख्यानाचा पौराणिक संदर्भ दिलेला नाही.

आगाशे यांनी ती दृष्टांतकथा थोडक्यात दिली आहे. तिचा सारांश साखऱ्यांच्या उद्‌धृत जोडकथेसारखाच आहे.

वेलिंगकरांच्या शब्दभांडारातही (१९५९) शेवटी काही कथांचे उल्लेख येतात. मात्र त्यातील 'गणिका'वरील टिपेत ते म्हणतात, 'हिचे स्थान, नाव वगैरे माहिती मिळत नाही.' (परिशिष्ट क्र. ६)

याप्रमाणे आगाशे व वेलिंगकर ही कथा मिळत नसल्याची स्पष्ट नोंद करीत असले, तरी अनेकांच्या डोक्यात 'गणिका = भागवती कथेतील पिंगला' हे समीकरण पक्के रुजलेले दिसते. या संदर्भातील काही उदाहरणे पाहू.

(१) **श्री ज्ञानेश्वर दर्शन** (भाग पहिला) संपादक - न. बा. देशमुख, (१९३४)

साहित्य खंडमधील ना. मो. सोमण यांचा लेख - 'श्री ज्ञानेश्वरीतील कथासंदर्भ-' यामध्ये ते म्हणतात, 'ही ओवी (११.१०७) पिंगला गणिकेला उद्देशून असावी. पिंगला गणिकेची कथा भागवत (११.८)मध्ये येते, ती अशी...'(पृ.१९२) यापुढे सोमण ती भागवती कथा उद्धृत करतात.

(२) **स्वामी स्वरूपानंद** - 'अभंग ज्ञानेश्वरी'- प्रथमावृत्ती, १९५९. संदर्भप्राप्त तृतीयावृत्ती, १९७३.यामध्ये शेवटच्या परिशिष्टात स्वरूपानंद ११.१०७च्या संदर्भातील गणिकेचे स्पष्टीकरण करताना भागवतातील पिंगलेची कथा देऊन तिला साखऱ्यांच्या जोडकथेची पुरवणी जोडतात.

(३) **प्रा. गो. म. कुलकर्णी** - 'ज्ञानेश्वरांची साहित्यदृष्टी आणि सृष्टी', १९९२. यातील एका निबंधात, ज्ञानेश्वरांनी पुराणकथांचे रहस्य कसे ओळखले आहे, हे सांगताना (११.१०७) कुलकर्णी या ओवीच्या संदर्भात पिंगला वेश्येचा उल्लेख करतात. (पृष्ठ ५६)

अनेकांच्या डोक्यात रुतून बसलेली ही पिंगलाकथा आता पाहू.

भागवताचा अकरावा स्कंध हा श्रीकृष्णांनी निजधामाला जाण्यापूर्वी उद्धवाला केलेल्या उपदेशावर भर देणारा आहे. त्यामध्ये एके ठिकाणी श्रीकृष्ण यदू व अवधूत यांमधील संवादाचा उल्लेख करतात. हा अवधूत यदूला आपण निरनिराळ्या गुरूंकडून काय काय शिकलो हे सांगताना पिंगला या वेश्येकडून आपण 'नैराश्य' (मुक्तिमार्गाला लावणारा निर्वेद) शिकल्याचे सांगतो. तो म्हणतो, ''विदेह नगरीत पिंगला नावाची एक वेश्या होती. एके दिवशी ती नेहमीप्रमाणे उत्तम शृंगार करून कामुकांना भुलविण्यासाठी दाराबाहेर उभी होती. परंतु मध्यरात्रीपर्यंत कोणीही फिरकले नाही. त्यामुळे तिच्या मनी नैराश्य दाटून आले. त्या भरात तिला जो निर्वेद प्राप्त झाला त्यामुळे ती म्हणते, ''मी आजवर द्रव्याच्या आशेने क्षुद्र रतीच्या मागे धावले व माझ्या आत्म्याला व्यर्थ शिणवले. आता यापुढे सर्व देहधाऱ्यांचा जो नियंता - आत्माराम - त्यालाच मी माझे सर्वस्व देऊन त्याच्याशीच रममाण होणार.'' अशा प्रकारे ग्राम्य रती टाकून देऊन तिने आपले मन आत्म्याच्या ठिकाणी दृढ केले. त्यामुळे तिला परम शांती प्राप्त झाली.''

या कथेचे तात्पर्य सांगताना अवधूत म्हणतो,

*''आशा हि परमं दुःखं नैराश्यं परमं सुखम् ।*
*यथा संछिद्य कान्ताशां सुखं सुष्वाप पिंगला ॥''* (११.८. ४३)

अशी ही 'पिंगले'ची कथा. मौज अशी की ही कथा संक्षिप्त रूपात महाभारतातही आली आहे. शरपंजरी पडलेले भीष्म युधिष्ठिराला उपदेश करताना हीच कथा सांगतात

व शेवटी म्हणतात,

*सुखं निराशः स्वपिति नैराश्यं परमं सुखम् ।*
*आशामनाशां कृत्वा हि सुखं स्वपिति पिंगला ॥*

(महाभारत - शांतिपर्व - १६८.५२ - भांडारकर प्रत. १७४.६२ चित्रशाळा प्रत)

महाभारतातील कथेचे व तात्पर्यवजा श्लोकाचेच अनुसरण भागवतात केलेले दिसते. मात्र एक गोष्ट नोंदण्याजोगी अशी की येथे कुठेही वेश्येने पाळलेल्या पोपटाचा उल्लेख नाही.

भागवताशिवाय अन्य दोन पुराणांत 'पिंगला'नामक वेश्येची कथा आहे. त्याही कथांचा परिचय करून घेऊ. पहिली आनंदरामायणातील. या रामायणाच्या 'विलासकांड' अध्याय ८ मध्ये पुढील कथा येते :

अयोध्या नगरीमध्ये पिंगला नामक एक वेश्या राहात होती. तिच्या मनात रामाविषयी अभिलाषा निर्माण झाली म्हणून ती एका रात्री गुपचूपपणे रामाच्या शयनस्थानी आली. रामाने तिला सांगितले, ''तू कंसमंदिरी दासी होऊन रहा. तेथे पुढील अवतारी मी तुझा मनोरथ पूर्ण करीन.''

ही हकीगत स्वतः रामानेच सीतेला सांगितली. तेव्हा ती प्रथम रागावली. परंतु रामाने जेव्हा वसिष्ठांच्या पायावर हात ठेवून आपण शुद्ध असल्याचे सांगितले, तेव्हा ती लज्जित झाली. सीतेने नंतर पिंगलेला बोलावून घेतले व चांगला मार दिला. मग सीतेने तिला शाप दिला, 'तू तीन ठिकाणी वाकडी होशील व कंसाची दासी होशील.' नंतर तिच्या विनवणीवरून सीतेने उःशाप दिला, ''कृष्ण तुझा उद्धार करील.''

दुसरी कथा स्कंदपुराणामधील (ब्रम्होत्तर खंड, अ. १० व ११) आहे. ती थोडक्यात अशी :

अवंतीनगरीमध्ये मंदर नावाचा एक ब्राह्मण राहात होता. तो कोणतीही धर्मकृत्ये करीत नसे. सदैव परस्त्रियांशी रत होई. पुढे तो पिंगला नामक वेश्येकडेच राहू लागला. त्या दोघांकडे एकदा ऋषभ नावाचा एक शिवयोगी आला. त्यांनी त्याचे उत्तम स्वागत करून पूजन केले. शिवभक्ताचे पूजन केल्यामुळे त्या दोघांना राजगृही पुनर्जन्म मिळाला. मंदर हा राजा वज्रबाहू व राणी सुमती यांच्या पोटी जन्मला. तर पिंगला ही राजा चंद्रांगद व राणी सीमंतिनी यांच्या पोटी जन्मली. त्या ऋषभ शिवयोग्याच्याच मध्यस्थीने त्यांचा विवाह झाला. (या कथेचा मधला भाग त्या ब्राम्हणाने पुनर्जन्म झाल्यानंतर भोगलेल्या त्रासाचा व शिवयोग्याच्याच कृपेने त्रासमुक्त झाल्याच्या तपशिलाचा आहे.)

ही कथा श्रीधराच्या 'शिवलीलामृता'त (अ. ७ व ८) तपशिलवार व मोरोपंतांच्या

'ब्रम्होत्तर खंड'मध्ये (अ. १०) प्रायः मुळाबरहुकुम अनुवादित केलेली आहे. भागवती कथेप्रमाणेच या दोन पिंगला-कथांमध्येही पोपट पाळण्याचा उल्लेख नाही.

येथवर ज्ञानदेवी (११.१०७)च्या संदर्भात शोध घेतला. आता अन्य संतांच्या अभंगांत कुठे हा दृष्टान्त आला असल्यास पाहू.

त्यासाठी नामदेव, एकनाथ व तुकाराम यांचे काही अभंग पाहू. (या अभंगांचे निर्देश सकलसंतगाथ्यातील असून अन्यत्र ते पाहणे सोपे व्हावे म्हणून अभंगाच्या प्रथम ओळीचा निर्देश केला आहे. तुकारामांच्या अभंगांचा निर्देश सकल व शासकीय अशा दोन्हींमधून केला आहे.)

**नामदेव**

(१) (*'नामाचा प्रताप जाणवेना कोणा...'* क्र. ६५९) या अभंगातील तिसरी ओळ

*'कुंटिणी ते नीच राव्यासाठी नेली ।*
*वैकुंठीं ठेविली सन्निधची ॥ ३ ॥'*

(२) (*'करीं घेऊनी ब्रम्हवीणा...'* क्र. ६५७) या अभंगातील पाचवी ओळ

*'कुंटिणी पक्षिया म्हणे रामा ।*
*तिसी नेलें निजधामा ॥ ५ ॥'*

(३) (*'नामाचा प्रताप काय सांगू वाचे..'* क्र. ७५९) या अभंगातील चौथी ओळ

*'कुंटिणी जारणी शुकमिसें गाय ।*
*वैकुंठासी जाय ततूक्षणीं ॥ ४ ॥'*

हे काही प्रमुख उल्लेख. अन्य अभंगांतही अनेक आहेत.

**एकनाथ**

सकलसंतगाथ्यात एकनाथांच्या अभंगांत 'रामनाम महिमा' वर्णन करणारे १८८ अभंग आहेत. त्यांतील जवळ जवळ वीसएक अभंगांत 'गणिका तारिली रामनाम घेतां ।' असा वा या आशयाचा दृष्टांतपर उल्लेख येतो. नंतरच्या नाममहिमापर अभंगातील एक निर्देश फक्त येथे नोंदून घेऊ -

('नामाचें महिमान सादर ऐका...' क्र. ११६३) या अभंगातील तिसरी ओळ-

*'गणिका पांखिरूं नाम जपे सदा ।*
*नोहे तिसी बाधा गर्भवासा ॥ ३ ॥'*

**तुकाराम**

सकलसंतगाथा क्र. ३०३५ (शासकीय गाथ्यात या अभंगाचा आरंभ 'करुणा

बहुत...' असा असून त्याचा क्रमांक ३८९३ असा आहे.)

(१) उपरोक्त क्र. ३०३५ हा संपूर्ण अभंग असा आहे -

*भक्तकरुणा बहुत तुझिया अंतरा ।*
*मज विश्वंभरा कळों आलें ॥ १ ॥*
*पक्षीयासी तुसें नाम जें ठेविलें ।*
*तयें उद्धरिलें गणिकेसी ॥ २ ॥*
*कुंटिणी ते दोष बहु आचरली ।*
*नाम घेतां आली करुणा तुज ॥ ३ ॥*
*हृदय कोमल तुझें नारायणा ।*
*ऐसें बहुवां जना तारियेलें ॥ ४ ॥*
*तुका म्हणे सीमा नाही तुझे इये ।*
*कोमळ हृदय पांडुरंगा ॥ ५ ॥*

(२) ('गंधर्व आणि सोम...' क्र. १३४ शासकीय गाथा क्र. २५७)
या अभंगातील चौथी ओळ -

*'गणिका अजामेळ कुब्जा ते विदुर ।*
*पाहतां विचार पिंगळेचा ॥ ४ ॥'*

असे हे काही निवडक निर्देश.

नामदेवाच्या निर्दिष्ट अभंगात स्पष्टपणे पक्षी/रावा, शुक, पाळणाऱ्या गणिकेचा अभंगातही पांखराचे नाम (अर्थात् रामाचे) जपणाऱ्या गणिकेचाच उल्लेख आहे. तुकारामांच्या क्र. ३०३५ या अभंगात पक्ष्याचे नाव देवावरून ठेवणाऱ्या गणिकेचा व शिवाय कुंटिणीचाही उल्लेख आहे. यावरून या दोघी भिन्न असल्याचे लक्षात येते. ही कुंटिणी कोण ते क्र. १३४ मधील अशाच पृथक् निर्देशांतील 'पिंगळे'च्या स्पष्ट उल्लेखावरून समजते. विष्णुबुवा जोगांच्या सार्थ गाथ्यात उक्त क्र. ३०३५ हा अभंग ३००५ या क्रमांकावर आहे. त्यांनीही स्पष्टपणे या दोन वेश्यांच्या पृथक् निर्देश केला आहे. उक्त क्र. १३४ हा अभंग जोगांच्या गाथ्यात १२२ या क्रमांकावर आहे. तेथील अर्थावरूनही या दोघी वेगळ्या असल्याचे लक्षात येते.

आता अभ्यासकांनी येथेही 'पोपट पाळणारी गणिका' व भागवती कथेतील 'पिंगला' यांना एकच मानून गोंधळ करून ठेवला आहेच.

या संदर्भातील एकच उदाहरण घेऊ.

डॉ. हे.वि. इनामदार यांनी 'नामा म्हणे' नामक संग्रहात (इ.स. १९९९) नामदेवांच्या ३६६ अभंगांचे विवरणासह संपादन केले आहे. नामदेवांचा पूर्वोक्त

क्र. ६५९ हा अभंग त्यांच्या संग्रहात क्र. ८७ (पृ. १०८)वर आहे. त्यातील 'कुंटिणी ते नीच राव्यासाठी नेली...' या ओळीचे त्यांचे विवरण असे आहे -

'पिंगळा'नामक वेश्येने मरतेसमयी आपल्या दारातील पिंजऱ्यातल्या पोपटाला 'विठू' म्हणून त्याच्या नावाने साद घातली. तेव्हा नकळत तिने विठ्ठलाचेच नाव उच्चारले. त्या तिच्या पुण्याईच्या बळावर विठ्ठलाने वैकुंठात आपल्या सान्निध्यात तिला स्थान दिले.

डॉ. इनामदारांनी पिंगलेचा मूळ भागवती संदर्भ पाहिला नसावा. कारण याच अभंगात पुढे जो अजामीळाचा उल्लेख आहे. त्यावरही भाष्य करताना ते त्याला 'पातकी राक्षस' म्हणतात. वस्तुतः अजामीळाची कथा (भागवत ६.१ व २) मध्ये जेथे येते, तेथे तो केवळ एका दासीच्या नादाने अनंत पापांचा धनी झालेला ब्राह्मण आहे. डॉ. इनामदार हे संत साहित्याचे गाढे अभ्यासक म्हणून प्रसिद्ध आहेत. 'संत नामदेव' हा तर त्यांचा पीएच.डी. प्रबंधाचा विषय आहे. त्यामुळे त्यांनी केलेले विवरण गृहीत धरून पिंगळा व अजामीळ यांच्याविषयीची प्रामादिक माहिती योग्य मानली जाण्याचा धोका दुर्लक्षणीय नाही.

या शोधोद्योगाचे फलित काय ? तर पोपट पाळणारी गणिका म्हणजे भागवती कथेतील पिंगला नव्हे. आणि हिचा पौराणिक संदर्भ मिळत नाही; निदान मला अजून मिळालेला नाही. ■

मु.पो. : चौल, ता. अलिबाग, जि. रायगड ४०२२०३.

## कलांमधून श्रीमंती

ग्रंथांचे वाचन आपले आयुष्य समृद्ध करते हे तर खरे, पण अशा ग्रंथवाचनाला पूरक होत जाणारे अन्य माध्यमांतले वाचनही महत्त्वाचे असते. कधी ते ग्रंथवाचनाला नवे परिमाण देते तर कधी स्वतंत्रपणे ग्रंथवाचनाच्या तोडीस तोड अशा अनुभवविश्वाला तुम्हाला सामोरे आणते. प्रत्येक कलामाध्यमाची त्याची त्याची अशी बलस्थाने असतात आणि त्याच्या त्याच्या मर्यादाही असतात. त्यामुळे एकाच एक माध्यमात गर्क होण्यासोबतच अशा अन्य माध्यमांकडेही वाचणाऱ्याने वळत रहावे. संगीत, शिल्प, चित्र, नाट्य, चित्रपट, नृत्य अशा विविध कलाप्रकारांतून आपण आपल्याला अधिकाधिक श्रीमंत करत जातो. ■

**सतीश काळसेकर**, 'वाङ्मय वृत्त' : वर्ष ३, अंक ३, पृष्ठ १

# चक्रधरांची लोकशिक्षणाची शैली

**वैशाली श्रीकृष्ण भालसिंग**

**प्रास्ताविक**

'दृष्टांतपाठ' हा महानुभावीय विद्वान पंडित केशिराजबास तथा केसोबास यांनी संकलित-संपादित केलेला ग्रंथ आहे. महानुभावांचे तत्त्वज्ञान, यादवकालीन समाजजीवन, दृष्टांतातील वाङ्मयीन सौंदर्य आणि मराठीच्या लावण्याची नव्हाळी अशा अनेक दृष्टींनी तो महत्त्वाचा ग्रंथ आहे. मध्ययुगीन मराठी गद्याचे भाषिक सामर्थ्य आणि सांस्कृतिक संचित एकवटलेले आहे.

वाङ्मयप्रकारांची विविधता हा महानुभावांच्या वाङ्मयाचा विशेष आहे. 'दृष्टांतपाठ' हा आपल्या पद्धतीचा मराठीतील एकमेव ग्रंथ आहे. अशा प्रकारचा दुसरा मराठी ग्रंथ दाखविता येत नाही. संप्रदायाची गरज आणि जीवनशैली यातून त्याची निर्मिती झालेली आहे. महानुभाव पंथामध्ये नव्याने प्रवेश केलेल्या अध्यात्म-साधकाला सोप्या पद्धतीने पंथाचे तत्त्वज्ञान आणि आचारधर्म यांची ओळख करून देण्याची गरज होती. 'लीळाचरित्र' (इ. स. १२७८) या ग्रंथामध्ये विखुरलेली श्रीचक्रधरांची सामग्री विशिष्ट दृष्टीने आणि विशिष्ट पद्धतीने केसोबासांनी 'दृष्टांतपाठा'त संकलित केली आहे. श्रीचक्रधरांची निवडक तत्त्वगर्भ सूत्रे, त्यांच्या स्पष्टीकरणासाठी त्यांनी दिलेले लौकिक दृष्टांत केसोबासांनी एकत्र केले. त्या दोन्हींचा एकमेकांशी असलेला संबंध उलगडून दाखविणारे, ''दार्ष्टांतिक'' स्वतः लिहिले. त्यामुळे साधकाचा सुबोध मार्गदर्शक ग्रंथ असे स्वरूप 'दृष्टांतपाठा'ला प्राप्त झाले आहे.

या ग्रंथाचा अभ्यास अनेक दृष्टींनी, पद्धतींनी आणि प्रकारांनी करता येण्यासारखा आहे. त्यात श्रीचक्रधरांच्या उपदेशवाणीची, लोकशिक्षणाची खास शैली दिसून येते. त्याविषयीचा थोडा विचार येथे करावयाचा आहे. श्रीचक्रधरांच्या लोकशिक्षणाच्या शैलीचा विचार करण्यासाठी रोमान याकोब्सन यांच्या भाषाविषयक सिद्धांताचा आधार घेता येईल.

सुप्रसिद्ध रशियन भाषावैज्ञानिक रोमान याकोब्सन (इ. स. १८९६-१९८२) यांनी भाषिक संज्ञापनाचे विश्लेषण 'लिंग्विस्टिक्स अँड पोएटिक्स' या निबंधामध्ये केले आहे. त्यांच्या मते भाषेच्या साहाय्याने जे संज्ञापन होत असते, त्यात सहा घटक काम करीत असतात. (१) वक्ता/सेंडर, (२) श्रोता/रिसिव्हर, (३) संदर्भ,

पार्श्वभूम/कॉंटेक्स्ट, (४) संदेश/मेसेज, (५) संपर्क/ कॉंटॅक्ट आणि (६) माध्यम (कोड) या सहा घटकांच्या सहयोगातून भाषा सहा प्रकारची कामे करते :

(१) आविष्कारात्मक (इमोटिव्ह), (२) परिणामनिष्ठ (कोनेटिव्ह),
(३) निर्देशात्मक (रेफरेन्शिअल), (४) काव्यात्म (पोएटिक),
(५) संपर्कनिष्ठ (फॅटिक) आणि (६) अतिभाषिक (मेटॅलिंग्वल).

संज्ञापनाच्या क्रियेत संदेशाचा भर ज्या घटकावर असेल त्याप्रमाणे ते कार्य वरचढ ठरते. इतर कार्ये त्याला साहाय्यक ठरतात. याचे थोडक्यात स्पष्टीकरण करता येईल-

(१) संदेशाचा भर जर वक्त्यावर असेल तर भाषा भावनांचे वहन करणारी बनते. भावकविता, ललितनिबंध, आत्मचरित्र, प्रवासवर्णन, दैनंदिनी इत्यादी साहित्यप्रकारांमध्ये आत्माविष्काराला मोठा वाव असतो.

(२) संदेशाचा भर जर श्रोत्यावर असेल तर भाषा ज्ञानाचे/माहितीचे संक्रमण करणारी बनते, श्रोत्यावर विशिष्ट परिणाम घडविण्याचे कार्य करते.

(३) संदेशाचा भर तो संदेश ज्या प्रसंगाच्या संदर्भात दिला जात असेल त्यावर असेल तर भाषा निर्देश करणारी बनते.

(४) संदेशाचा भर जर संदेशावरच असेल तर भाषा काव्यात्म बनते.

(५) संदेशाचा भर जर संपर्कावर असेल तर भाषा संपर्कनिष्ठ कार्य करते.

(६) संदेशाचा भर संकेतप्रणालीवर असेल तर भाषा अतिभाषिक कार्य करते.

श्रीचक्रधरांच्या उपदेशवाणीच्या शैलीचा विचार करताना हे विश्लेषण उपयुक्त ठरेल.

**वक्ता :**

या उपदेशवाणीचे वक्ते श्रीचक्रधर आहेत. चराचर सृष्टीशी सख्यत्व आणि विरोध यांनी जोडलेले ते पूर्णपुरुष होते. ईश्वरी अवताराची प्रतीती देणारे दैवी सामर्थ्य त्यांच्याजवळ होते. ते जातीने ब्राह्मण, कर्माने क्षत्रिय आणि वृत्तीने नि:संग महात्मे होते. 'लीळाचरित्रा'तून जाणवणाऱ्या त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला सहृदयतेचा मानवी स्पर्श आहे. वेध लावणारे रूपसौंदर्य, वाणीतला गोडवा, लखलखीत प्रज्ञेचे वैभव, अपार करुणा आणि जिवाच्या उद्धरणाची तळमळ हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विशेष भोवतालच्या लोकांना खेचून घेणारे होते. दु:खितांविषयीचा कळवळा, प्राणिमात्रांविषयीचा जिव्हाळा आणि सर्वांविषयीचे अथांग प्रेम त्यांच्या वागण्यातून जागोजाग दिसते. स्वातंत्र्य, समता, वैराग्य, ज्ञान, प्रेम आणि करुणा या दैवी गुणांची ते साक्षात् मूर्ती होते. त्याचे व्यक्तिमत्त्व वेध लावणारे होते. ते प्रियवक्ता होते. जनकल्याणाच्या भावनेने त्यांचे हृदय भरलेले होते. त्यामुळे त्यांचे शब्द जिवाचा कान करून ऐकले जात.

**श्रोता :**

आपल्या एकसष्ट वर्षांच्या आयुष्यापैकी जेमतेम आठ वर्षे ते लोकान्तात आले. जन्माने गुजराती असलेल्या श्रीचक्रधरांनी महाराष्ट्राला आपली कर्मभूमी मानले आणि मराठीला आपली धर्मभाषा बनविले. इ.स. १२६७ ते १२७४ या आठ वर्षांमध्ये उभयगंगातीर म्हणजे गोदावरी नदीच्या दोन्ही काठावरचा प्रदेश त्यांनी पिंजून काढला. नगरापासून वाड्यावस्त्यांपर्यंत, मंदिरांपासून महारवाड्यांपर्यंत सर्वत्र संचार केला.

त्यांच्याभोवती सगळ्या तऱ्हेची माणसे होती. राजे, सरदार, धनवंत यांच्यापेक्षा त्यांचा ओढा 'सामान्यु परिवारु' आणि 'म्हातारिया' यांच्याकडे अधिक होता. त्यात शेतकरी, व्यापारी, किमयागार, लोहार, भडभुंजे, गुळवे, कोल्हाटी असे वेगवेगळे व्यावसायिक आहेत. ब्राह्मण, मराठा, न्हावी, शिंपी, साळी, कोळी, गुरव, भोई, तांबोळी, महार, चांभार अशा नाना जातीपातीची माणसे आहेत. धानाई, भाईदेव यांच्यासारखी मुले आहेत आणि योगिनी-मुक्ताई सारखी जरठ स्त्री आहे. पती आणि मुले यांच्या मरणाने व्याकुळ झालेल्या हातरित्या विधवा स्त्रिया आहेत. दु:खी बालविधवा आहेत तशा प्रसन्न सुवासिनीही आहेत. साधा, चांगदेव अशी बाळीभोळी माणसे आहेत. त्याचप्रमाणे षट्शास्त्रपारंगत आणि 'काव्यालापकलापकेलिकुशल' अशा विशेषणांनी गौरविले गेलेले पंडित आणि कवी आहेत. त्यात भक्त आहेत, अभक्त आहेत. अल्पकाळ संबंध आलेले आहेत तसे जीवप्राणाने अनुसरणारे आहे. वेगवेगळ्या थरांतील नाना जातीपातींचे लहान-थोर स्त्री-पुरुष श्रीचक्रधरांच्या भोवती आहेत. त्यांना उद्देशून ते बोलत आहेत.

**संदेश :**

परतत्त्वाच्या शोधासाठी नि:संग होऊन जीव पाखडणारी आणि आपले जन्मजीवित ईश्वराच्या चरणी वाहणारी असंख्य माणसे येथे आहेत. या सर्वांसाठी श्रीचक्रधरांचा संदेश कोणता होता ?

श्रीचक्रधरांना पारमार्थिक कल्याण साधावयाचे होते. त्याचवेळी इहलोकीचे जीवन सत्य, समता, न्याय आणि नीती या तत्त्वांवर उभे करावयाचे होते. स्त्री-शूद्रांना इह-पर कल्याणाचा मार्ग दाखवावयाचा होता. प्रचलित धर्मपरंपरेला नकार देत धर्म आणि समाजव्यवस्था यांची त्यांनी पर्यायी मांडणी केली. अद्वैताच्या गजरामध्ये द्वैताचे प्रतिपादन केले. जीव, जगत्, देवता आणि ईश्वर या चार महातत्त्वांची मांडणी करून त्यांनी वैराग्य आणि नैतिक मूल्ये यांचा नवा धर्ममार्ग सांगितला. माणसाला बांधून टाकणारी बंधने झुगारली. शूद्रातिशूद्रांवर मायेची पाखर धरली. पुरुषांच्या बरोबरीने स्त्रियांनाही धर्मक्षेत्रात सन्मानाने प्रवेश दिला.

त्यांना जे सांगावयाचे होते ते त्यांनी स्वत:च्या नावाने, स्वत:च्या अधिकाराने आणि स्वत:च्या प्रामाण्याने सांगितले. त्यामुळे त्यांच्या विचारात नवेपणा आणि ताजेपणा आहे. त्यात एक प्रकाराचा टवटवीतपणा आहे. त्यांच्या विचारामुळे आणि वागण्यामुळे स्त्री-शूद्रांच्या कोंडलेल्या चित्तवृत्तींना मोकळ्या वाऱ्याची झुळूक मिळाली. दबल्या-दाबल्या, चिरडल्या-चुरडल्या गेलेल्या माणसांना समानतेचा, मुक्ततेचा अनुभव मिळाला. भूतदयावादी, मानवतावादी अशा संतांचे प्रेमळ, विशाल आणि उदार अंत:करण चक्रधरांजवळ होते, यात शंका नाही.

**संदर्भ :**

श्रीचक्रधरांच्या उपदेशवाणीचा संदर्भ पाहणे आवश्यक आहे. श्रीचक्रधरांनी सलगपणे आपल्या तत्त्वज्ञानाचे विवरण केलेले नाही. मुळात श्रीचक्रधर हे पांडित्यजड धर्मज्ञ नव्हते. त्यांची जातकुळी प्रेषिताची होती. जीवन जगताजगता त्याचा अर्थ लावणारे हे मन आहे. त्यामुळे साध्यासुध्या घटनांमध्येही त्यांना विश्वात्मक सत्याचा साक्षात्कार होतो. त्यांच्या सूत्रांमागील संदर्भ पाहिले तर ही गोष्ट सहज लक्षात येईल. तळपत्या उन्हातून चालताना त्यांचे पाय धुळीने भरतात तेव्हा महदायिसा शिवलिंगावरील अभिषेकपात्र घेते आणि स्वामींचे पाय धुते याचे सारंगपंडितांना आश्चर्य वाटते. पण श्रीचक्रधरांच्या मुखातून सूत्र प्रकटते - *'स्नेहांचा ठायी उचित स्फुरे.'* जेथे खरा स्नेह असतो तेथे योग्य गोष्टी आपोआपाच केल्या जातात. श्रीचक्रधरांचे धर्मचिंतन असे जीवनाबरोबर सहजपणे उमललेले तत्त्वज्ञान आहे. ते त्यांनी कसे मांडले आहे ते आता आपण पाहू.

**सूत्र :**

सूत्ररूपाने ठसठशीत विधान करणे ही श्रीचक्रधरांच्या उपदेशवाणीची एक रीत होती. जीवनाचे सर्वांगाने अवलोकन केलेल्या आणि सत्याचे आकलन झालेल्या महामानवाचे दीर्घकालीन चिंतन एखाद्या साक्षात्कारासारखे सूत्ररूपाने बाहेर पडत असते. श्रीचक्रधरांनी माणसाचे अंतरंग आणि जीवनाचे बहिरंग जाणलेले होते. ते सर्वज्ञ होते. अनेक शास्त्रे, विद्या आणि कला त्यांच्यासमोर होत जोडून उभी होती. कोणत्याही गोष्टीचे मर्म तळहातीच्या आवळ्यासारखे त्यांच्या नजरेला स्वच्छ दिसत असे. त्यातून त्यांची सूत्रे उसळून येतात.

''जवंजवं जाणता: तवंतवं नेणता'' (विचार १६४), ''जीतेनि मृताचां धर्मी वर्तावें :''(आचार ७४), ''देवो करावें ते केले : पुरुषे करावें ते ठेले''(आचार २५५), ''बिढारावरि काइ बिढार असे ?''(विचार २६४), ''पोळलेल्या सुने याचेया परी असावे''(आचार २९९), ''आचारें तेयाचा धर्म''(आचार ५२), ''जन्मजीवित

परमेश्वरा देयावे'' (आचार ७४), ''प्राणांसि आहारु देयावा : इंद्रियांसि नेदावा''(आचार ९७) अशी कितीतरी वचने कानावर पडताच मनात शिरतात. त्यांच्या शब्दयोजनेत मितव्यय आहे. त्यात काही वेळा दृष्टांत गुंफलेला् असतो. कधी त्यात रूपकभाव आढळतो. ही सूत्रे താललयबद्ध आहेत. ती विलक्षण परिणाम करतात. मनाची पकड घेऊन त्याला अंतर्मुख करण्याचे सामर्थ्य सूत्रांमध्ये आहे. त्यांच्यांत शाश्वत सत्य तालबद्ध पद्धतीने आणि साररूपाने गुंफलेले आहे. त्यामुळे त्यांच्यात अवतरणक्षमता आली आहे.

**कथेचे माध्यम :**

जनसामान्यांविषयीच्या जिव्हाळ्यातून श्रीचक्रधरांची उपदेशवाणी जन्मलेली आहे. ती लोकांच्या बोलीतूनच बोलकी झालेली आहे. ही तत्त्वसूत्रे त्यांनी व्यवहारातल्या साध्यासुध्या दृष्टांतांनी सुबोधपणे समजावून दिलेली आहेत. आपला उपदेश सर्व लोकांना सहजसुलभ व्हावा म्हणून तो कथेच्या माध्यमातून देण्याची जगभरच्या प्रेषितांची पद्धत आहे. उपनिषद, त्रिपिटक, बायबल आणि कुराण यांमधून ते सहज लक्षात येते. 'दृष्टांतपाठा'तील श्रीचक्रधरांची उपदेशवाणी लोकशिक्षणाची हीच शैली वापरते.

कथेच्या अनुरोधाने बोध करणे ही सगळ्याच प्रेषितांची लोकप्रिय पद्धत आहे. श्रीचक्रधरांचेही काही दृष्टांत कथारूप घेताना दिसतात, ''आधारियेचा परिसाचा दृष्टांत'' (क्र.५४) या दृष्टीने पाहण्यासारखा आहे. त्यात मोजक्या घटना आहेत. ब्राह्मण आणि ब्राह्मणी महात्म्याचे मनापासून स्वागत करतात, ही पहिली घटना. त्यामुळे प्रसन्न झालेला महात्मा आपल्याजवळच्या परिसाने ब्राह्मणाच्या लोखंडी अवजारांना सोन्याचे रूप देतो ही दुसरी घटना. या कृपेचे मर्म न समजता ब्राह्मणाने महात्म्याला दिलेले दूषण ही तिसरी घटना. या कृपेचे मर्म जाणून ब्राह्मणीने केलेला गौरव ही चौथी घटना. अशा मोजक्या घटनांतून ही कथा आकार घेते. श्रोत्यांना किंवा प्रेक्षकांना माहीत होतात पण कथेतील पात्रांना माहीत नसतात, अशा पुष्कळ गोष्टी या कथेत आहेत. महात्म्याने लोखंडी अवजारांचे सोने बनविले हे ब्राह्मणाला माहीत नसते, पण आपल्याला माहीत असते. त्यामुळे ''आजि सोनेयाचा देहाडा वाया गेला !'' हे ब्राह्मणाचे उद्गार हास्य निर्माण करतात. यामुळे दुर्दैव ओढवले असे त्याला वाटते. त्याचमुळे खरे तर त्याचे दैव उघडलेले असते ! या विरोधामुळे या दृष्टांतकथेत एक नाट्य निर्माण होते आणि ते तिच्या सौंदर्यात भर घालते.

या कथेतील प्रसंगांचे कथन तपशीलवार आणि चित्रमय पद्धतीने करण्यात आलेले

आहे. त्यातील व्यक्तिचित्रणे ठसठशीत आहेत. अशा प्रकारे मोजक्या घटना, मोजकी पात्रे, अंगभूत नाट्यात्मकता, बारकाईची वर्णने, लोकभाषेचा सौंदर्यस्पर्शी वापर ही या दृष्टांतांची वैशिष्ट्ये आहेत. हा दृष्टांत लघुकथेसारखा आटोपशीर आहे. एकच संस्कार करणे हेच लघुकथेचे वैशिष्ट्य असते. तेच येथेही दिसते. त्यामुळे श्रीचक्रधरांसारखा श्रेष्ठ धर्मचिंतक दृष्टांताचे निरूपण करू लागला की त्याला आपोआपच कथेचे रूप प्राप्त होते.

अशा दृष्टांतकथा वरवर सोप्या वाटतात. लहानांना त्या ऐकायला आवडतात; पण मोठ्यांना त्या विचारप्रवृत्त करतात.

**संवादांचा प्रभावी वापर :**

संवादांचा प्रभावी वापर हा दृष्टांतपाठाचा एक विशेष आहे. या दृष्टीने 'रूंभणेयाचा दृष्टांत'(क्र.४१) पाहण्यासारखा आहे. कोणतीही गोष्ट समजून देताना व्यवहारात आपण दुसऱ्या गोष्टीचा दाखला देतो. पण जन्मांधाला कोणतीच गोष्ट माहीत नसते. त्यामुळे तो प्रश्नामागून प्रश्न विचारत राहतो आणि डोळस दाखल्यामागून दाखले देत राहतो. हा संवाद असा आहे -

''हा गा दूध ते कैसे ?''

''दूध ते पांढरे.''

''पांढरे ते कैसे ?''

''पांढरे ते बळेसारिखे.''

''बळहे ते कैसे ?''

''बळहे हे रुंभणेयासारिखी.''

''रुंभणे ते कैसे ?''

''रुंभणे ते ऐसे : भणौनि हात वाकुडा करुनि पाहिले.'' असे म्हणून त्याने हात वाकडा करून दाखविला. दूध म्हणजे काय ते जन्मांधाला समजून देण्याचा प्रसंग येथे विनोदी शैलीने कथन केलेला आहे. जन्माधांला जी उत्तरे मिळतात. ती दृक्संवेदनांच्या रूपात. त्यामुळे त्याला ती समजत नाहीत. अखेरी या दृक्संवेदनेचे स्पर्शसंवेदनेत रूपांतर करून उत्तर दिले जाते. तेव्हा संवाद मूळ गोष्टीपासून इतका दूर सरकतो की दूध म्हणजे काही एक वाकडी वस्तू आहे, असा अर्थ निर्माण होतो ! प्रश्नोत्तरांच्या अनावर गतीतून ते वक्रवळण विनोदाच्या वाटेला जाऊन भिडते, ते श्रीचक्रधरांच्या संवादकौशल्यामुळे.

संवादांच्या वैपुल्याने दृष्टांत खुमासदार, यथातथ्य, रंजक आणि जिवंत होतात. या संवादपद्धतीने व्यक्तिविशेष स्पष्ट होतात. प्रसंगातील जिवंतपणा अधिक प्रत्ययकारी

होतो. आणि बोलीभाषा उत्स्फूर्तपणे नैसर्गिक रूपात वापरणे शक्य होते. उपदेशवाणीत नाट्यमयता येते.

**विनोदाचा वापर :**

देव म्हणजे सूत गुंडाळण्याचे गोल लाकूड. हे देव आणण्यासाठी बाजाराला निघालेला साळी रस्त्यात एका झाडाखाली थांबतो. तो कल्पवृक्ष असतो. सर्व काही देण्याचे सामर्थ्य असलेला कल्पवृक्ष सापडल्यावरही साळी त्याला काय मागतो तर ''देव''. त्याप्रमाणे प्रसन्न झालेल्या परमेश्वराचे प्रेम मागण्याऐवजी स्वार्थी जीव प्रपंचसुखच मागतात. असे चक्रधर हसत हसत सांगतात. त्यांच्या दृष्टांतांना असे गमतीदार विनोदकथांचे रूप येते (दृ.क्र. ११) त्यामुळे त्या श्रोत्यांचे रंजन करतात आणि त्याचवेळी त्यांच्या मनाचे उद्‌बोधनही करतात.

**सर्वस्पर्शी दाखले :**

श्रीचक्रधरांच्या सहवासात येणारे पुष्कळसे लोक शेती करणारे असत. त्यामुळे त्यांच्या अनुभवातील गोष्टींचा वापर श्रीचक्रधरांनी दृष्टांतांमध्ये केलेला आहे.

वडाचे रोप लहान असताना शेळ्या-मेंढ्यांच्या खुरांनी तुडविले जाते. पण वड जुनाट झाला म्हणजे हत्तींचे कळपही त्याला हलवू शकत नाहीत.(दृ.क्र. ७६) असे सांगून त्यांनी साधनेच्या अवस्था मनावर ठसविल्या आहेत.

निसर्ग आणि कविसंकेत यांचा प्रभावी वापर श्रीचक्रधरांनी केलेला आहे. चंद्राच्या किरणांनी पाषाण थंड होतात. पण सोमकांत मणी मात्र पाझरतो. त्याप्रमाणे अनधिकाऱ्याला परमेश्वराचे सुख मिळते, पण अधिकारी जीवांना मात्र त्याचे बोध आणि दातृत्व मिळते.(दृ.क्र. ९)

दैनंदिन व्यवहारातील नेहमीच्या अनुभवांनी श्रीचक्रधर आपले तत्त्व श्रोत्यांच्या गळी उतरवितात. शेवाळलेल्या खडकावर पाय ठेवणारा घसरून पडतो. त्या प्रकारे तामस पुरुषाला ज्ञान देणारा दु:खी होतो.

प्राण्यांचे येणारे अनुभवही चक्रधरांनी आपल्या उपदेशासाठी वापरले आहेत. धड तुटले तरी जिवाने परमेश्वरास सोडू नये, हे सांगताना श्रीचक्रधरांनी माकोड्याचा म्हणजे मुंगळ्याचा दाखला(क्र. ५६) दिला आहे. मुंगळा झाडला, ओढला तर त्याचे धड तुटते, पण तो तिथून हलत नाही. त्याप्रमाणे कितीही कष्ट पडले तरी जिवाचे जीवन असलेल्या परमेश्वराला सोडू नये. भाजलेल्या कुत्र्याला कोठेच(दृ.क्र. ८६) चैन पडत नाही. त्याप्रमाणे ईश्वराचा विराह झालेल्या भक्ताला कोठेच मन:शांती मिळत नाही.

लौकिक अनुभवांच्या आधाराने अलौकिक अनुभवांची ओळख करून देण्याची श्रीचक्रधरांची पद्धत आहे. स्वामीसेवक संबंध, स्त्री-पुरुष संबंध, आई-मूल संबंध या

तीन महत्त्वाच्या संबंधांतून ईश्वर आणि भक्त यांच्या संबंधाचे स्वरूप श्रीचक्रधरांनी सहजपणे उलगडून दाखविले आहे. कामी पुरुष स्त्रियांचा शोध घेत गावोगावी भटकत राहतो, हे आपल्या अनुभवाचे आहे. त्याच्या आधाराने परमेश्वर आर्त भक्तांचा वाडोवाडी शोध घेतो, याची आपण कल्पना करू शकतो. (दृ.क्र. ३७)

श्रीचक्रधरांच्या शिष्टमंडळात 'म्हातारिया' म्हणजे स्त्रिया पुष्कळच होत्या. त्यामुळे त्यांच्या अनुभवांतील गोष्टींचे दाखले श्रीचक्रधरांनी आवर्जून दिलेले आहेत. पतिव्रता पतीला जन्मजीवित अर्पण करते, त्याप्रमाणे भक्ताने परमेश्वराला अनन्यभावाने अनुसरावे(दृ.कृ. ६३), असे चक्रधर सांगतात. पत्नीला वरात पाहण्यासाठीही दारात उभे राहू न देणाऱ्या मत्सरी पतीचे उदाहरण (दृ.क्र. ८२) असेच आहे.

आई आणि मूल यांच्या लडिवाळ प्रेमाची वत्सल चित्रे या वैराग्यपर ग्रंथात आढळून यावीत, हे केवढे आश्चर्य ! आलेपाले भरून आलेल्या मुलाला तूपभाताचा घास भरवू पाहणारी आई आणि पान्हा फुटताच लेकराची भूक जाणून त्याच्याकडे धाव घेणारी आई. (दृ.क्र. ३८) अशी आई-मूल संबंधाची मोहक चित्रे दृष्टांतांत येतात (दृ.क्र. ३९, ४४, ६८, ९१, ९८, ९९) अशी चित्रे श्रोत्यांना आपली स्वत:चीच चित्रे वाटतात.

पुराणे, काव्यसंकेत, वनस्पतिसृष्टी आणि प्राणिसृष्टी, माणसाचा देह आणि मन, त्याला येणारे वास्तव अनुभव, त्याच्याभोवतीचे जग या सर्वांचा दाखले देण्यासाठी श्रीचक्रधरांनी उपयोग केला आहे. त्यामुळे त्यांचा उपदेश चकटन् समजणारा झाला.

**दृष्टांताची कथनशैली**

दृष्टांतातील कथनशैली/वर्णनशैली लक्षात येण्यासाठी पुढील उतारा पाहू :

''घरींचिया ब्राह्मणी वोसरीए पीठे घातले : पाए धुतले : तांबीया भरुनि दीधला : गाए दुहीली : राळे याचे खीचटें रांधिले : लोणीयाचा कवडा ताविला : मग तयासि ठावों (पात्र) केला : तया दोघांरी तो जेविला : तुटकी ऐसी बाज तिएवरि फाटकी ऐसी वाकळ आंथुरीली : ते नीजावेया दीधली : तयाचे पाए धुतले : चोपडीले : इतुकेनी तो संतोषला'' (दृ.क्र. ५४)

असा बारीक बारीक तपशील छोट्या-छोट्या वाक्यांतून देऊन पायरी-पायरीने संपूर्ण चित्र उभे करणे, ही या दृष्टांतांची वर्णनपद्धती आहे. त्यातील घटनाक्रम व बारकावा पाहण्यासारखा आहे. त्यामुळे ही वर्णनशैली प्रसंगकथन करण्यात यशस्वी होते. त्याचबरोबर व्यक्तिमनाचे दर्शनही तिच्यातून सहजपणे होते. यातून आपल्यासमोर दारिद्र्यातही मनाची श्रीमंती सांभाळणारे आतिथ्यशील जोडपे आणि संतुष्ट झालेला महात्मा जाणवतात.

**आणखी काही भाषा विशेष :**

तत्सम्, तद्भव आणि अस्सल देशी वळणाचे मराठी शब्द यांनी 'दृष्टांतपाठ' सजला आहे.

जोडशब्द (इळेखिळे, पालापाणी), द्विरुक्ती (ऐसी-ऐसी, आफळ-साफळ)

विरोधी (ऐल-पैल, वोखटे-गोमटे), लयगर्भ (कटकटीयेमात, गुळ्ळा, डुळ्कणे) असे अनेक प्रकार त्यांत आढळतात.

लोकजीवनाचे दाखले देणारा 'दृष्टांतपाठ' हा लोकांच्या भाषेतच बोलका झालेला आहे. म्हणी आणि वाक्प्रचार ही लोकभाषेची लेणी आहेत. त्यांचे वैभव 'दृष्टांतपाठा'त पुढीलप्रमाणे पाहायला मिळते :

आधारीएसि असणे (दृ.क्र. ७) जवळ संग्रही असलेला.

खैरी जुंपणे (दृ.क्र. १३) रहाटास जुंपणे

आल्या पालेथा पोट भरणे (दृ.क्र. २५) अरबटचरबट खाणे.

'दृष्टांतपाठा'चा वाक्यबंध वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यात अनुवादात्मक रचना आढळते. ही एक प्रकारची पुनरुक्तीच असते आणि श्रोत्यांना अर्थ चटकन् कळावा, हाच तिचा उद्देश असतो. जसे -

''तयाचि जीव्हे कुष्ट लगे : तया तयाची जीभ झडे'' (दृ.क्र. ८)

''भूक न वचे : तथा तृप्ति नव्हे'' (दृ.क्र. २०)

क्रियापदाची पुनरुक्ती करून एखाद्या क्रियेची आवर्तने ''दृष्टांतपाठा''त प्रभावीपणे सुचविली जातात. ज्याप्रमाणे -

''तयाचे एक द्वार धरीजे तवं आणीक द्वार वाहे: ते धरीजे तवं आणीक वाहे'' (दृ.क्र. ७०)

क्रियापदांची पुनरुक्ती करून प्रसंगचित्राला खालीलप्रमाणे प्रभावी केले जाते -

''तो (माकोडा) झाडीता झडेना, तोडीता तुटेना : ऐसांही झाडीने तरि धड तुटे परि झडेना : (दृ.क्र. ५६)

दोन गोष्टींतील तरतमभाव -

''लाभापासुनी लाभ'' (दृ.क्र. ३९) ''साधनापसि साध्य उत्तम'' (दृ.क्र.११४)

आणि साम्यविरोध -

''राणीयेचा पूत ऐसा दीसतु असे'' (दृ.क्र. १३)

''तीएसी चंदनतैला चीखलु : अन्न तैसी माती'' (दृ.क्र. ८९)

यासारख्या परिणामकारक लकबी या भाषेत आहेत. कधी कधी ही वाक्ये एकापुढे एक येऊन एक साखळी निर्माण करतात. जसे,

"बाइ : पाप तरि नव्हे परि अविधी होए ॥ गा विधी करितां अविधी स्फुरे : अविधी अविधीतें प्रसवे :" (दृ.क्र. ९४)

संवाद-शैलीमुळे दृष्टांत खुमासदार, यथातथ्य रंजक आणि जिवंत होतात. या संवादपद्धतीने व्यक्तिविशेष स्पष्ट होतात. प्रसंगातील जिवंतपणा अधिक प्रत्ययकारी होतो आणि बोलीभाषा उत्स्फूर्तपणे नैसर्गिक रूपात वापरणे शक्य होते.

अभिनयगर्भता हा या भाषेचा आणखी एक महत्त्वाचा विशेष. दृष्टांत सांगणारा अभिनयाची जोड देऊन मूळ शब्द अधिक परिणामकारक बनवतो.

"ते तोंड ऐसे पळवी : ऐसे पळवी" (दृ.क्र. २५)

"तो (सुरी) हाती घे : ऐसे पाहे : ऐसी पाहे" (दृ.क्र. ४०)

बारीक बारीक तपशील भरीत, टप्प्याटप्प्याने प्रसंगचित्र पूर्ण करण्याची पद्धती येथे दिसते. (दृ.क्र. ५९) नाट्यमयता आणि विनोदात्मकता ही दृष्टांतांचीच वैशिष्ट्ये असल्याने येथील शैलीही नाट्यपूर्ण आणि विनोदगर्भ होते.

ह्या सर्व वैशिष्ट्यांमुळे "दृष्टांतपाठ" हा यादवकालीन गद्याचा सुंदर नमुना ठरला आहे. ■

**श्री-१८, नंदनवन कॉलनी, कोहिनूर मंगल कार्यालयासमोर, झावेडी,**
**अहमदनगर ४१४००३**

कोणतेही सरकार एखाद्या लोकभाषेच्या वापराला जी बंधने घालते ती शिक्षण आणि राज्यकारभार या दोन क्षेत्रांत प्रामुख्याने असतात. लोकभाषेत शिक्षण मिळत नाही, तिला अभ्यासक्रमात प्राधान्य दिले जात नाही आणि राज्यकारभार लोकभाषेतून होत नाही. ज्यांना माध्यमिक किंवा उच्च शिक्षण घ्यायचे आहे किंवा शासनाच्या एखाद्या कार्यालयाशी संबंधित काही काम आहे त्यांना राज्याने लादलेल्या दुसऱ्या भाषेचा आश्रय घेणे भाग पडते.

भाषा आणि संस्कृती जुळ्या बहिणीसारख्या बरोबर बरोबर वाढतात. समाजाचे धार्मिक आचार आणि विधी, उपासनेच्या पद्धती, सामाजिक रीतीरिवाज, व्यक्तीव्यक्तींचे परस्पर संबंध नियमित करणारे नियम, वागणुकीचे संकेत, अभिव्यक्तीच्या पद्धती, निवास, पोषाख, आहार इत्यादींच्या परंपरा या सर्वांचा संस्कृतीत समावेश होतो. त्याचबरोबर समाजाच्या वैचारिक संचिताचाही संस्कृतीत अंतर्भाव होतो. संस्कृतीच्या अंगाने भाषा वाढते.

**न्या. नरेंद्र चपळगावकर,** मराठवाडा साहित्य संमेलन, डिसेंबर २००४
अध्यक्षीय भाषण

# ‘चाळ’ आणि मूळाक्षरे

सुधीर रा. देवरे

मी तेव्हा इयत्ता सातवीत असेन. मराठी विषय शिकविण्यासाठी आम्हांला रौंदळ आडनावाचे शिक्षक होते. आमच्या मराठीच्या पाठ्यपुस्तकात पु.ल. देशपांडे यांच्या ‘बटाट्याची चाळ’ ह्या पुस्तकातील एक उतारा समाविष्ट झालेला होता.

शिक्षक त्या धड्यातील एकेक परिच्छेद वाचून आमच्या चेहऱ्यांवरील प्रतिक्रिया न्याहाळत होते. उताऱ्यांत ‘बटाट्याची चाळ’ असा उल्लेख येत होता व त्याला अनुसरून लेखकाचे जे भाष्य होते ते ऐकून आम्ही हसून प्रतिसाद द्यावा अशी त्यांची अपेक्षा होती. तसा प्रतिसाद आमच्याकडून मिळत नव्हता म्हणून ते वैतागले. त्या वैतागातच ते म्हणाले,

‘‘तुम्हांला विनोद कळतो की नाही ? तुमच्या चेहऱ्यावरची तर रेषाही हलत नाही. अरे, ही विनोदी भाषा आहे, एवढं तरी कळतं का तुम्हांला ?’’

आमच्या शिक्षकांचा वैताग जितका खरा होता तितकीच विशिष्ट शब्दामुळे अशा विनोदाला दाद देता येत नसल्याची आमची अडचणही साहजिक होती. तो शब्द म्हणजे ‘बटाट्याची चाळ’, कारण आम्हांला परिचयाची होती ती अहिराणीतील ‘कांदानी चाळ’. शेतातून कांदे काढल्यानंतर ते बाजारात घेऊन जाण्याआधी व्यवस्थितपणे ठेवण्यासाठी आमच्याकडील अहिराणी शेतकरी ‘कांद्यांची चाळ’ तयार करतात. ग्रामीण झोपडीसारखी ह्या चाळीची रचना असून ती झोपडीपेक्षा खूप लांबट असते. दोन्ही बाजूंना झोपडीसारखा उतार देऊन वर उसाचे पाचट टाकले जाते. म्हणजे पावसात कांद्यांवर पाणी गळत नाही. आणि आजूबाजूला कपाशीच्या सोट्यांच्या कवाड्या (ताट्या) करून ती चारही बाजूंनी बंद केली जाते. एका बाजूला एक ताटी उघडता - लावता येईल अशी सोय केलेली असते. अशा या विशिष्ट वास्तूला ‘कांद्यांची चाळ’ म्हणतात. खेड्यातील शेतकरी कितीही गरीब असला तरी या चाळीत तो घरासारखे राहायला जात नाही. राहण्यासाठी त्याचे वेगळे घर असते.

म्हणून ‘बटाट्याची चाळ’ हा शब्द आम्ही ऐकताच आमच्या डोळ्यांसमोर

'कांद्याची चाळ' उभा राहिली. 'कांद्यांची चाळ' असते, तशी 'बटाट्यांची चाळ' असावी, असा साहजिक आमचा समज झाला. आणि यात हसण्यासारखे वा विनोदासारखे आम्हांला काहीच वाटले नाही. उलट अचंबा वाटला की, धड्यातील वर्णनानुसार या पात्रांची आर्थिक - सामाजिक परिस्थिती चांगली असूनही मुंबईसारख्या मोठ्या शहरात हे लोक 'बटाट्याच्या चाळीत' का राहत होते !

हा धडा शिकविण्याआधी, शहरात 'चाळ' नावाचा एक 'घर' प्रकार आहे, तो कसा, कशाला चाळ म्हणतात, हे आम्हांला स्पष्ट करून सांगणे शिक्षकांचे कर्तव्य होते. ते त्यांनी केले नाही म्हणून हा सर्व गोंधळ होत होता आणि जेव्हा प्रौढ वयात शहरात आल्यावर 'चाळ' नावाचा घरांचा प्रकार आम्हांला समजला तेव्हा तर आमचे आख्खे खेडेच एक 'चाळ' असते, असेही लक्षात आले.

मूळाक्षरे शिकविण्याच्या पद्धतीतील शहरी दृष्टिकोण ग्रामीण मुलांवर लादल्यामुळे ग्रामीण मुलांचे शैक्षणिक नुकसान होते. अभ्यासाविषयी त्यांच्या मनात आकस निर्माण होतो.

उदाहरणार्थ, 'अननस' हे कोकणातील फळ आता सर्वत्र पाहायला मिळत असले तरी तीस वर्षांपूर्वी बागलाण तालुक्यातील विरगाव गावी हे फळ पाहायला मिळणे कधीच शक्य नव्हते. तरीही शाळेत 'अ - अननसाचा' असेच आम्हांला म्हणावे - शिकावे लागत होते. 'अननस' हे काय असते, कसे असते, हे वडील मंडळींनाही सांगता येत नव्हते. फक्त 'अ' शिकताना 'अ - अननसाचा' म्हणण्यापुरतेच अननसाचे स्थान आहे का, हेही स्पष्ट होत नव्हते. आणि शिक्षक आपण होऊन असे शंकानिरसन करत नव्हते. ग्रामीण भागात तेव्हा शिक्षकांबद्दल इतका धाक असायचा की दहावीत शिकणारे विद्यार्थीसुद्धा शंका विचारणे टाळत असत. तर पहिलीतल्या मुलाची कल्पनाच केलेली बरी !

ग्रामीण व शहरी भागात सर्वत्र जी वस्तू (फळ, पदार्थ, धान्य, पशू, पक्षी) माहीत असेल अशा गोष्टींचा उल्लेख करून पाठ्यपुस्तके तयार व्हायला हवीत. पण तसे होताना दिसत नाही. खरे तर 'अ' शिकविताना 'अ - अडकित्त्याचा' म्हणता येऊ शकले असते.

अथवा 'अ - अजगराचा'ही म्हणता आले असते. 'अडकित्ता' व 'अजगर' ग्रामीण व शहरी ह्या दोन्ही भागांत पाहायला मिळू शकतात; पण आम्ही पहिलीत होतो तेव्हा असे घडले नाही.

अजून काही उदाहरणे देता येतील :

| मूळाक्षरे | पुस्तकातील वस्तूंची नावे | सार्वत्रिकतेसाठी काय हवे |
|---|---|---|
| अ | अननस | अडकित्ता/अजगर |
| आ | आगगाडी | आरसा/आई |
| इ | इजार/इरले | इस्तरी/इमारत |
| ई | ईडलिंबू | ईद |
| ए | एडका | एक |
| अं | अंबारी | अंग/अंगण/अंजीर |
| ज | जहाज | जव/जमीन |
| फ | फणस | फराळ/फटाके |
| भ | भजन | भगर/भवरा |
| म | मगर | मका/मध |
| य | यज्ञ | यम/यळकोट |
| र | रथ | रवा |
| श | शहामृग | शरद |
| ह | हरण | हरबरा |
| क्ष | क्षत्रिय | क्षण |

सर्व प्रदेशांत समजतील अशा वस्तूंची नावे पुस्तकात दिली तर प्राथमिक शिक्षण सोपे होऊन विद्यार्थ्यांना शिकायची आवड निर्माण होऊ शकते. अजगर, आरसा, आई, इमारत, अंग, अंगण, अंजीर, भवरा, मका, मध, शरद, क्षण हे शब्द अलीकडील काही 'गाइड' अंकलिप्यांमध्ये मूळ जड शब्दांना पर्यायी शब्द म्हणून दिलेले दिसत असले तरी तीस वर्षांपूर्वी अशी परिस्थिती नव्हती. म्हणून आमच्या पिढीतील प्राथमिक शाळेत शिक्षण घेणाऱ्या मुलांची खूप कुचंबणा झाली. 'अननस' सारख्याच आगगाडी, इजार, इरले, ईडलिंबू, एडका, अंबारी, जहाज, फणस, मगर, यज्ञ, रथ, शहामृग, हरण, क्षत्रिय या गोष्टी आमच्या रोजच्या जीवनाच्या अविभाज्य घटक नव्हत्या आणि बऱ्याचशा पाहण्यातही नव्हत्या. शिक्षक म्हणतात म्हणून आम्ही म्हणायचो, 'श - शहामृगाचा' अथवा 'आ - आगगाडीचा'. पण 'आगगाडी' कशी असते? तर चित्रात दिसते तशी. या पद्धतीने दुधाची तहान आम्हांला ताकावर भागवावी लागत असे.

आजच्या ग्रामीण-आदिवासी मुलांना मन:पूर्वक शिक्षण द्यायचे असेल तर त्यांच्या रोजच्या परिचित वस्तूंपासून व त्यांच्या मायबोली भाषेतूनच ते सुरू करायला हवे, तरच आपण त्यांना शिक्षित करण्यात यशस्वी होऊ शकू. ■

**टेलिफोन कॉलनी, बसस्थानकामागे, सटाणा (जि. नाशिक) ४२३ ३०१.**

# एकटी

इंदिरा संत

एकटी - मिळवती. ती मग कशीही
लहान, मोठी, विवाहित अविवाहित
गरीब, श्रीमंत - शेवटी ती एकटी...

एकटीचे दार उघडे... आत गप्पा
प्रश्नांच्या माश्या घोंगावत आत बाहेर -
कोण ? काय ? कसल्या ?
एक रिकामटेकडे कुतूहल
एकटीचे दार बंद. प्रश्नांचे तीर दारावर
अस्वस्थ. तर्कग्रस्त. मनात गाठी बांधणारे...
एकटीचे बाहेर जाणे - नीटनेटके, सहज दिमाखाचे
मागून प्रश्नांचा घोळका -
कुठे ? कुणाकडे ? कशाला ? उत्सुक उतावळा...
एकटीचे यश - बढतीचे, पगारवाढीचे, बदलीचे, परीक्षांचे
प्रश्नांच्या माना खाली - हिरमुसलेले हिंसक
कुणामुळे ? कशामुळे ?
एकटीच्या घराला कुलूप. सगळे प्रश्न दुर्मुखलेले.
दुखवट्याच्या सभेसाठी उत्सुक...
आज इथला, उद्या तिथला - तिच्याच आयाबहिणींचा

एकटीच ? कशी ? कोण ? कुठून ? का ?
आणखी... आणखी...

■

'वंशकुसुम' मुंबई : पॉप्युलर प्रकाशन, १९९४, पृ. ८-९

# इंदिरा संत यांची 'एकटी'

शकुंतला क्षीरसागर

'वंशकुसुम' हा इंदिराबाई संत यांच्या कवितांचा संग्रह १९९४ साली प्रकाशित झाला. त्या संग्रहातल्या कविता निसर्गातूनच प्रकटलेल्या आणि निसर्गाशी एकरूप झालेल्या आहेत, असे इंदिराबाईंनी आपल्या मनोगतात म्हटले असले, तरी 'एकटी', 'एक मिनिट', 'तर ते जीवन' या वेगळ्या अनुभवांचे चित्रण करणाऱ्या कविताही या संग्रहात आहेत. प्रस्तुत लेखात 'एकटी' या कवितेत एकवटलेली शैलीची वैशिष्ट्ये नोंदण्याचा प्रयत्न केला आहे.

'एकटी' या कवितेच्या मथळ्यावरून ही कविता एखाद्या विरहिणीवर लिहिलेली असावी असा तर्क कुणी केला तर तो साफ चुकला आहे असे म्हणावे लागेल. या ना त्या कारणाने एकलेपणाचे जीवन जगणाऱ्या मिळवतीच्या वाट्याला येणाऱ्या अनुभवांचे चित्रण इंदिराबाईंनी या कवितेत केले आहे. 'माझी कविता माझ्या भावनात्मक आयुष्याशी निगडित आहे' असे त्यांनी 'शेला' या काव्यसंग्रहाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत म्हटले आहे. (१९६६, पृ. २१) या कवितेतले इंदिराबाईंचे अनुभव इतके सच्चे आहेत की, एकटेपण वाट्याला आलेल्या माझ्यासारखीला इंदिराबाईंनी माझेच अनुभव या कवितेत अतिशय प्रभावीपणे मांडले आहेत असे वाटते.

या कवितेतली 'एकटी' मिळवती आहे. ती वयाने लहान असो किंवा मोठी असो; विवाहित असो किंवा अविवाहित असो, गरीब असो किंवा श्रीमंत असो, तिच्या शेजारणींच्या दृष्टीने हे भेद महत्त्वाचे नसतात. तिचे 'एकटे'पण हेच फक्त महत्त्वाचे असते.

तिचे दार उघडे असताना आतून गप्पा ऐकू येत असतील तर तिच्या रिकामटेकड्या शेजारणींच्या मनात, तिच्याकडे कोण आले असतील ? ते काय बोलत असतील ? कसल्या गप्पा मारीत असतील ? असल्या प्रश्नांची गर्दी होते. तिचे दार बंद असले तर त्या शेजारणी अस्वस्थ होतात, काही तरी तर्क लढवतात. ती व्यवस्थित पोशाख करून सहज ऐटीत बाहेर गेली तरी तिच्या शेजारणी ती कुठे गेली असेल, कुणाकडे

गेली असेल, कशाला गेली असेल या प्रश्नांनी घायकुतीला येतात. 'एकटी'ला नोकरीत वरची जागा मिळाली पगारवाढ झाली, परीक्षांतही तिला यश मिळाले तर या निरुद्योगी बायकांचा विरस होतो. तिला मिळालेले यश कुणामुळे, कशामुळे मिळाले असेल याची त्या चर्चा करतात आणि निराश होतात. तिच्या घराला कुलूप दिसले तर तिच्या शेजारणी उदास होतात, दु:खी होतात. एकटीच्या मागे तिच्याच आयाबहिणींच्या प्रश्नांचा घोळका सतत असतो.

वास्तविक कोणाही एकट्या स्त्रीला तिच्या शेजारच्या आयाबहिणींनी आधार द्यायला हवा. पण अनुभव मात्र उलटा येतो. तिच्या शेजारणीच तिच्या छुप्या शत्रू असतात, हे आपल्या समाजात आढळणारे चित्र रंगवताना इंदिराबाईंनी योजलेला सूक्ष्म पण प्रभावी उपहास आणि त्याची कलात्मक बांधणी करण्यातले त्याचे कौशल्य रसिक वाचकांची मान्यता मिळवते.

या आधी उल्लेख केलेल्या 'शेला' या संग्रहाच्या प्रस्तावनेत त्यांनी आपल्या कवितेच्या रचनेबद्दल म्हटले आहे, ''एकदा कवितेचं बीज सापडलं की, ती कविता रचताना मी कधी घाई करत नाही. कितीतरी दिवस ती कविता मनातच तयार होत असते. शब्द आणि प्रतिमा यांच्याबद्दल मी अतिशय काटेकोरपणा करीत असते. शब्द सोडा, एखादी मात्राही कवितेचा तोल घालविते किंवा धरून ठेवते असा माझा विश्वास आहे (पृ. १३). इंदिराबाईंच्या या साक्षीच्या आधारानेच 'एकटी'मधील शैलीचे विश्लेषण येथे केले आहे.

लहान-मोठ्या एकवीस ओळींच्या या कवितेत पहिल्या तीन ओळींचा एक गट आहे. 'एकटी'चे वय, तिचा आर्थिक किंवा सामाजिक दर्जा यापैकी कशालाच तिच्या शेजींच्या दृष्टीने महत्त्व नसते, तिचे एकटेपण हेच महत्त्वाचे ठरते हे ठसवण्यासाठी लहान, मोठी, विवाहित, अविवाहित, गरीब, श्रीमंत या विरुद्धार्थी, विशेषणांच्या तीन जोड्यांची योजना केली तसेच या गटातला 'एकटी' हा पहिला शब्द गटाच्या शेवटीही पुन्हा योजून 'एकटी' हे शीर्षक वाचकांच्या मनावर बिंबवले आहे.

दुसऱ्या गटात 'एकटी'च्या शेजारणींच्या मनात येणारे सगळे संशय, सगळ्या शंका व्यक्त करण्यासाठी कोण? काय? कसल्या (तिसरी ओळ); कुठे? कुणाकडे? कशाला? (नववी ओळ) कुणामुळे? कशामुळे? (बारावी ओळ) या प्रश्नांच्या मालिकेचा उपयोग केला आहे. या प्रश्नांमधल्या 'क' या वर्णाची उपस्थिती त्या गटातल्या एक, रिकामटेकडे कुतूहल, नीटनेटके, घोळका, उत्सुक, हिंसक, कुलूप, एकटीचे, एकटीच्या इत्यादी शब्दांमध्येही आढळते. प्रश्नांच्या घोळक्यासाठी 'उत्सुक उतावळा' आणि 'हिरमुसले हिंसक' ही अनुप्रासयुक्त विशेषणे साभिप्राय आहेत. 'एकटीचे यश -

बढतीचे - पगारवाढीचे, बदलीचे, परीक्षांचे' या ओळीतील नादलय वेधक आहे. 'आज इथला, उद्या तिथला,' ही समांतर रचना लयबद्धतेत वाढ करते.

तिसऱ्या गटात फक्त दोनच ओळी आहेत. त्यांमध्येही पहिल्या ओळीत एकटीच ? कशी ? कोण ? कुठून ? का ? ही पाच प्रश्नांची माळ आहेच. शेवटच्या ओळीत 'आणखी....आणखी...' हे दोनच शब्द आहेत. 'आणखी' या शब्दानंतर तीन टिंबांची योजना करून आणखी बरेच काही अव्यक्त ठेवल्याचे सुचवले आहे.

कवितेच्या बाह्यस्तरावरचे हे शैलीविशेष इंदिराबाईंनी जाणीवपूर्वक योजले असावेत असे तिच्या एकंदर बांधणीवरून वाटते.

कवितेच्या अंतस्तराची बांधणीही आशयसंपन्न झाली आहे.

एकटीचे दार बंद असल्यामुळे प्रश्नांचे अस्वस्थ, तर्कग्रस्त आणि मनात गाठी बांधणारे तीर दारावर येतात. इथे 'काही अनुमान करून पीडित झालेले' हा आशय व्यक्त करण्यासाठी 'तर्कग्रस्त' हा अत्यंत अर्थपूर्ण शब्द इंदिराबाईंनी घडवला आहे. 'व्याधिग्रस्त', 'चिंताग्रस्त' या रूढ शब्दांच्या अनुकरणातून घडवलेल्या या शब्दाने आयाबहिणींच्या मनातल्या शंकांचे, त्यांच्या संशयाचे स्वरूप अधिक नेमकेपणाने व्यक्त झाले आहे.

इंदिराबाईंनी योजलेल्या प्रतिमाही नाविन्यपूर्ण आणि अर्थव्यंजक आहेत. आयाबहिणींच्या प्रश्नांना अनुलक्षून घोंगावणाऱ्या माश्यांची आणि तीराची प्रतिमा इथे योजलेली आढळते. हे प्रश्न माश्यांप्रमाणे आतबाहेर घोटाळणारे आणि माश्यांप्रमाणेच ओंगळ, किळसवाणे असतात हे सार्थपणे व्यक्त झाले आहे. त्यातला सूक्ष्म उपहास फार प्रभावी वाटतो. 'प्रश्नांचे तीर' ही प्रतिमाही अशीच उचित वाटते. आयाबहिणींचे परस्परात नेत्रपल्लवीद्वारे होणारे मूक संभाषण 'एकटी'ला तीराप्रमाणे लागणारे, जखमा करणारे वाटते हे यातून सुचवले आहे.

आपल्या कवितेतल्या शब्दांच्या आणि प्रतिमांच्या योजनेत इंदिराबाई किती दक्षता घेत असत हे या कवितेत समर्थपणे प्रत्ययाला येते. ■

**२९/४१८, लोकमान्यनगर टपाल कचेरीच्या जवळ, पुणे ४११०३०.**

आपल्या संस्कृतीची वाटचाल बहुतेक वेळा भाषेतच व्यक्त होते. संस्कृती शब्दांच्या माध्यमातून व्यक्त होते. क्वचित कधी कधी तिला रंग-रेषांचा आधार घ्यावासा वाटतो व ती चित्र किंवा शिल्प अशा माध्यमातून व्यक्त होते. संस्कृतीचे सातत्य माध्यमामुळेच राहते. आपले आचार-विचार, आपले संकेत पुढच्या पिढ्यांच्या स्वाधीन आपण भाषेमुळेच करू शकतो.

**न्या. नरेंद्र चपळगावकर,** मराठवाडा साहित्य संमेलन, डिसेंबर २००४
अध्यक्षीय भाषण

# सिनेमाची भाषा

डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी

सार्वजनिक असूनही एकांतात बसल्यासारखे वाटायला लावणारे असे एक ठिकाण आपल्या परिचयाचे आहे. साऱ्यांना एकत्र करून प्रत्येकाच्या मध्ये ते अंधाराची भिंत उभी करते आणि प्रत्येकाला त्याच्या खुर्चीपुरत्या जागेत एकान्त बहाल करते. हे स्थान म्हणजे सिनेमागृह. आपल्या खासगी जीवनाला सार्वजनिक जागा व त्या सार्वजनिक जागेतील खासगीपण देणारी अशी ही एक वेगळीच जागा आपल्या सर्वांच्याच परिचयाची आहे.

पडद्यावरील प्रतिमेचे संरक्षक कवच असणारा हा अंधार आपल्याही संरक्षक कवचाचे कार्य सिनेमागृहात करीत असतो.

स्वत:चा, बाजूच्यांचा आणि इतरांचाही चेहरा विसरायला लावणारा सिनेमागृहातील हा अंधार वस्तुस्थिती आणि आपली प्रत्यक्ष स्थिती यात देखील फरक करायला लावतो. एखादा प्रभावी सिनेमा बघून आपण या अंधारातून उजेडात येताना आपली स्थिती झोपेतून हळूहळू जागे व्हावे अशा प्रकारची असते. गुंगी आणणाऱ्या मादक पदार्थांसारखे मनाला गुंगी आणणारे साधन म्हणून सिनेमा या प्रकाराकडे बघण्याचा दृष्टिकोणही तसा नवीन नाही. स्वप्नांची दुनिया, भ्रामक साधन, पळवाट शोधणारा, वास्तव, अवास्तव, घडवलेला, अशा कितीतरी, विशेषांनी 'सिनेमा' या प्रकारास संबोधले गेले आहे. दारू, तंबाखू, ड्रग्ज, धर्म, जुगार यांच्याप्रमाणे जीवनाच्या वास्तवापासून माणसाला दूर राखणारे व गुंगवणारे साधन या प्रकारात सिनेमाचाही समावेश करण्यात आलेला आहे.

ही निव्वळ आलंकारिक विधाने अथवा सिनेमाविरोधकांची एकेकाळची मोहीम म्हणून वापरली गेली असे नसून एरिष फ्रोम सारख्या मानसशास्त्रज्ञाने देखील सिनेमा बघण्याची तुलना दिवसा स्वप्न बघण्याच्या अवस्थेशी केलेली होती. 'फिल्म वर्ल्ड' या पुस्तकात माँटेग्यूने आठवड्यातून एकदा, दोनदा, तीनदा घ्यायचे, गुंगी आणणारे द्रव्य असे सिनेमाचे वर्णन केले. जीवनाच्या रटाळपणापासून पळ काढण्यासाठी म्हणून

माणूस सिनेमाला जातो असे सर्वसाधारणपणे आपण मानतो.

'पलायनवादी करमणूक' ही दृष्टी सिनेमाबाबत एवढी प्रभावी आहे की ज्याला आपण सर्वसाधारणपणे लोकप्रिय सिनेमा म्हणू त्याची निर्मितीच मुळी ही गरज लक्षात घेऊन केलेली असते व त्याकरताच तो सिनेमा स्वीकारला देखील जातो. मात्र 'पलायनवादी करमणूक' म्हणून सिनेमाकडे बघण्याची ही दृष्टी आणि 'सिनेमा' हा प्रकार व त्या प्रकाराबाबतची वास्तव जाण या भिन्न बाबी आहेत. त्यामुळेच सिनेमा हा कलाप्रकार म्हणून लोकप्रिय सिनेमांशिवाय अन्यत्र कुठेतरी शोधावा लागतो आणि 'आर्ट फिल्म'सारख्या अशास्त्रीय वाक्प्रचारांचा मग जन्म होतो.

सिनेमाचे सांस्कृतिकदृष्ट्या एकेकाळी दुय्यम असलेले स्थान आज तसे उरलेले नाही. सांस्कृतिकदृष्ट्या सिनेमा आज महत्त्वाच्या व मानाच्या जागेवर आहे. सिनेमाकडे आपले 'प्रतिबिंब' म्हणून वा आपल्या अथवा आपल्या अवती-भवतीच्या व्यवहाराचे 'प्रातिनिधिक' म्हणून बघण्याचे निर्माण झालेले दृष्टिकोण व एक कलाप्रकार म्हणून असलेले त्याचे अस्तित्व यांत मात्र फरक करून बघणे आवश्यक आहे.

सिनेमाचा दर्जा ठरवण्याकरिता त्यातील 'बौद्धिकता', संज्ञापनक्षमता ही महत्त्वाची मानायची की नाही, हा खरा प्रश्न आहे.

बौद्धिकतेला मिळणाऱ्या आवाहनाचा आनंद हा सिनेमाने द्यावयाच्या आनंदाचा भाग आहे की नाही ?

प्रबोधन करणे, प्रश्न मांडणे, त्याची उत्तरे देणे, मांडलेले प्रश्न आपल्या प्रश्नांचे प्रतिनिधित्व करतात अथवा नाही हे शोधणे व समकालीन वास्तव, आपण आणि सिनेमा यांचे नाते तपासणारी भूमिका घेऊन जनमाध्यम म्हणून, कलामाध्यम म्हणून त्यातील संज्ञापनाकडे बघणे हे सिनेमा या 'कलाप्रकारा'कडे बघणे ठरेल की नाही ?

आपल्या नसलेल्या वृत्ती, प्रवृत्ती, विचार, भावना, क्रिया-प्रतिक्रिया, ज्या आपल्या आवाक्यातही नसतात त्यांचेशीही सिनेमा आपला संबंध जोडत असतो, त्याचे काय?

समकालीन वास्तवातील विविध प्रश्नांशी असलेले, विविध व्यक्तिमत्त्वांशी, वृत्तींशी असलेले आपले नाते व त्यांचे आपण सिनेमात अपेक्षित असलेले 'प्रतिबिंब' अथवा 'प्रतिनिधित्व' हे आपल्याला सिनेमातून मिळणाऱ्या अतिशय व्यापक व व्यामिश्र अशा अनुभूतीचा निव्वळ एक भाग आहे, ते त्याचे सर्वस्व नव्हे हे विसरून कसे चालेल?

सिनेमाबाबत असे कितीतरी प्रश्न उपस्थित करता येणे शक्य आहे, व तसे ते केलेही जातात. मुळातच सिनेमा कसा पहावा, या प्रश्नाचे उत्तरच अशा अनेक प्रश्नांच्या उत्तरांतून शोधत जाण्याची गरज त्यामुळे निर्माण होऊ शकते.

आपल्या स्वप्न बघण्याच्या प्रक्रियेशी सिनेमा बघण्याची तुलना करून बघितली

तर आपल्या असे लक्षात येईल की आपले स्वप्न आपल्या अबोध मनाचा ताबा घेते. सिनेमा आपल्या अबोध मनात आपल्या स्वप्नाइतका व स्वप्नासारखा ताबा घेऊन वावरू शकत नाही. कारण सिनेमा या अवस्थेत तो आपल्यापासून 'वेगळा' असतो. स्वप्नावस्थेत आपण आणि स्वप्न वेगळे नसतो. सिनेमाशी असलेल्या आपल्या नात्याचे हे 'वेगळे'पण आपल्या आणि सिनेमाच्या संबंधात अत्यंत महत्त्वाचे आहे.

सिनेमातील पात्रांना वाटते ते वाटणे, त्यांच्या आशा, आकांक्षा, भीती, इच्छा, वासना हे सारे आपण सिनेमा बघताना 'वाटून' घेत असतोच. त्या पात्रांच्या सोबत आपण फक्त आपले 'डोळे' आणि 'कान' यांनीच तेवढे हे वाटून घेत असतो. वास्तवात ज्याला आधार नाही असे 'अनुभव', सिनेजगत आणि आपण यांच्यामधे असलेल्या रुपेरी पडद्यावर आपण घेत असतो. मानवी आयुष्यक्रमात गाडून ठेवाव्या लागणाऱ्या अनेक बाबींची अनुभूती निर्धोकपणे घेता येणे सिनेमामुळे, सिनेमा या माध्यमामुळे का होईना पण शक्य झाले. ते माध्यम त्यामुळेच जगभर एवढे लोकप्रियही झाले.

पण असा हा सिनेमा आपल्याशी नेमक्या कोणत्या 'भाषेत बोलतो? त्याची 'भाषा' आपल्याला खरोखरच कळली आहे काय ? आपण जी अथवा ज्या 'भाषा' बोलतो ती अथवा त्या भाषा आणि सिनेमा 'बोलतो' ती 'भाषा' यात काही फरक आहे काय ? फक्त सिनेमाची आणि सिनेमाचीच असलेली अशी देखील 'भाषा' असते. ही त्यातली पात्रे बोलतात ती भाषा नव्हे, याची जाणीव असणे हे सिनेमा या कलाप्रकाराबाबत जाणून घेण्यासाठी व माध्यम म्हणून आज आवश्यक होत चालले आहे.

साधारणपणे १९१० ते १९१५च्या दरम्यान 'फिल्म लँग्वेज', सिनेमाची भाषा, सिनेमा या कलाप्रकाराची भाषा, ही कल्पना उदयास आली. मेलिस, पोर्टर, ग्रिफिथ यांच्या प्रयत्नातून या कल्पनेचा उदय झाला. या मंडळींनी सिनेमा या कलाप्रकारातील 'पलायनवादी करमणूक', बौद्धिकता, तात्त्विकता, संदेश इ० बाबींकडे लक्ष पुरविण्यापेक्षा निर्मिती प्रक्रियेबाबत दक्ष असणे अधिक पसंत केले.

एकोणविसाव्या शतकात भाषाशास्त्र, मानवी भाषेचे स्वरूप, संरचना, निर्मिती तिचे सामाजिक वापर व शैलीगतता इ० बाबतीत नवनवे सिद्धांत मांडले गेले. आज ते एक प्रगत विज्ञान झाले आहे. मानवी शब्द-भाषेबाबत भाषाशास्त्राची एकोणिसाव्या शतकात जी स्थिती होती ती आज सिनेमाच्या भाषेबाबतची आहे.

भाषाशास्त्राने भाषा, तिची संरचना व सामाजिक, 'मानसशास्त्रीय' व शैली इ० संदर्भातील तिचे स्थान व स्वरूपाबाबत तसेच भाषेचे अर्थ व ध्वनी यांच्याबाबत गेले

शतकभर मांडलेल्या विविध सिद्धांतांमुळे मानवी भाषा, वाङ्मय, कला, व्यवहार, संवाद, माध्यम, इ० बाबत नव्याने विचार करण्यास सामग्री व पद्धती उपलब्ध करून दिल्या आहेत.

बोलण्याचे साधन जसे ध्वनी, चित्राचे साधन जसे रंग व रेषांचे संघटन, तसेच सिनेमाचे साधन काय? सिनेमातील किंवा सिनेबाह्य वास्तव किंवा वास्तवाचे चित्रीकरण ही काही सिनेमाची 'सामग्री' नव्हे.

मेट्झने या सामग्रीचे 'फिल्मिक' व 'सिनेमॅटिक' असे दोन भाग कल्पिलेले आहेत.

सिनेमा किंवा चित्रवाणी बघत असताना आपण जे नेमके बघतो, आपल्यापर्यंत ज्याद्वारे काही पोचत असते ते पोचविणारी साधने, माध्यमे ही मूलत: पाच प्रकारच्या सामग्रीची बनलेली आहेत हे जाणून घेतल्याशिवाय सिनेमाची भाषा व त्याचे भाषाशास्त्र याचा यथायोग्य परिचय होऊ शकणार नाही. मुळात सिनेमा या माध्यमप्रकाराशीच अगोदर संवाद प्रस्थापित होणे आवश्यक असून त्याकरता त्याची भाषा व तिचे शास्त्र याचे स्वरूपही जाणून घेणे आवश्यक ठरते.

स्थिर अशा छायाचित्रात्मक; हलत्या आणि बहुविध अशा तीन प्रकारच्या प्रतिमा, लिखित व इतर प्रकारची रेखांकित (ग्राफिक) सामग्री, ध्वनिमुद्रित संभाषणे, ध्वनिमुद्रित संगीत व ध्वनिमुद्रित आवाज तसेच इतर ध्वनी यांचा समावेश सिनेमाच्या सामग्रीत होतो. या सामग्रीचा मिळून सिनेमा तयार होतो. सिनेमातून होणारे (चिन्हांकन व) संज्ञापन, या सामग्रीद्वारा होत असते. भाषेतून होणारे संज्ञापन हे जसे ध्वनिरूप असलेल्या आकारित अक्षरांमधून चिन्हांकित होऊन आपल्यापर्यंत पोचत असते. भाषेतील मूळ सामग्री ही जशी ध्वनी असते तशीच सिनेमातील भाषेची मूळ सामग्री ही आपण बोलतो ती भाषा अथवा वास्तव तेवढे नसून वर उल्लेखिलेल्या या बाबी होत.

आपण बोलतो ती भाषा ही ध्वनी आणि अर्थ या दोन पातळ्यांवर वावरत असते. ध्वनी निर्देशित करावयाचा अर्थ त्या ध्वनींमध्ये समाविष्ट नसतो. तर तो ध्वनीहून वेगळा असतो. ध्वनी हे 'निर्देशक' तर अर्थ हे जे 'निर्देशित' केले जाते ते, असे हे वेगळेपण कायम असल्यामुळेच मर्यादित असलेली ध्वनिचिन्हे अमर्यादित अर्थ व्यक्त करण्याकरिता मानवी भाषेत वापरली जातात. त्यामुळे भाषाव्यवहारातून प्रभावीपणे संज्ञापन शक्य होते.

सिनेमाच्या ज्या सामग्रीचा आपण विचार करीत आहोत त्या सामग्रीच्या संदर्भात ही पाचही प्रकारची सामग्री अभिव्यक्तीकरिता वापरली जाते तेव्हा हे पाचही प्रकार सिनेमात एकजीव झालेले असतात हे ध्यानात घेणे आवश्यक आहे. या पाचही सामग्री-

प्रकारांतील कोणत्याही निव्वळ एका प्रकारातून सिनेमा 'बोलत' नाही तर या पाचही प्रकारांच्या एकजीवितेतून निर्माण झालेल्या अशा एककातून सिनेमा 'बोलत' असतो.

मानवी भाषेत जसे 'स्वनिम' हे ध्वनीचे अर्थ व्यक्त करणारे लघुतम घटक, पदिम हे जसे अर्थ व्यक्त करणारे लघुतम घटक तसे सिनेमाच्या भाषेत या कल्पनांना समांतर असे काही घटक उपलब्ध नसतात.

भाषेत वाक्यांची मालिका असते. त्याप्रमाणे सिनेमा हा असा वाक्यांच्या मालिकेसारखा असतो असे मेट्झला वाटते.

आपल्या दैनंदिन वापराच्या भाषेत आपण आपल्या डोक्यातील चित्र, प्रतिमा, शब्दांमध्ये, ध्वनींमध्ये ओतून पाठवतो, प्रवाहित करतो, म्हणजे 'बोलतो'. असे केले नाही तर आपल्याला संवादच साधणे शक्य होणार नाही. कारण डोक्यातील चित्र, प्रतिमा तशाच्या तशा दुसऱ्यापर्यंत पोचवण्याचे भाषेएवढे दुसरे सुटसुटीत व स्वस्त साधन तूर्तास तरी आपल्याजवळ उपलब्ध नाही. आपण त्यामुळे प्रत्यक्ष त्या प्रतिमांनी, चित्रांनी न बोलता त्यांना ज्या (चिन्हांत) भाषेत आणले त्या (चिन्हांद्वारे) भाषेद्वारे आपण बोलतो. आपण भाषेद्वारा संवाद प्रभावीपणे साधू शकतो याचे हे एक महत्त्वाचे कारण आहे.

सिनेमा हा त्या दृष्टीने, भाषेद्वारा साधल्या जाणाऱ्या संवादप्रक्रियेच्या तुलनेत भाषेएवढे सशक्त संज्ञापन करू शकत नाही. कारण सिनेमाची भाषा ही मानवी शब्द-भाषेसारखी दोन वेगळ्या पातळ्यांवर वावरू शकत नाही. त्यामुळे भाषेत ज्याप्रमाणे एका वेळी ध्वनित अर्थ वेगळा व गर्भित अर्थ वेगळा जाणवू शकतो तसे सिनेमाच्या भाषेत जाणवणे शक्य नसते. सिनेमात आपण प्रतिमा बघत असताना निर्मात्याची वृत्तीच बघत असतो. प्रतिमेला, भाषेतील ध्वनी व अर्थ चिकटलेले असतात. या दोन वेगळ्या पातळ्यांवर एकाच वेळी वावरणाऱ्या शब्दासारखे एकाच वेळी दोन पातळ्यांवर वावरणे सिनेमात प्रतिमेला शक्य नसल्याने प्रतिमेच्या भाषेतील संज्ञापन भाषेद्वारा साधल्या जाणाऱ्या संज्ञापनाइतके प्रभावी असत नाही, असे सांगितले जाते.

आणि तरीही आज सिनेमा ही जगातील सुशिक्षित व अशिक्षित अशा प्रचंड मोठ्या लोकसंख्येशी संपर्क साधण्याची प्रभावी 'भाषा' झाली आहे. लोकांच्या मनावर, भावनांवर नियंत्रण प्रस्थापित करण्याचे प्रभावी साधन म्हणून सिनेमाकडे बघितले जाते. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील सिनेमा ही एक महान सांस्कृतिक शक्ती म्हणून उदयाला आली आहे.

सामाजिक, आर्थिक आणि कलात्मक व्यवहारावर आधारित अशा या प्रकाराने निर्माते आणि प्रेक्षक दोघांनाही सारखेच प्रभावित केले आहे.

---

सिनेमाने कलावंताला कधी व इतरत्र कुठेही नव्हे एवढे तंत्राधीन केले आहे. कलेपेक्षा तिचे तंत्रच हे सिनेमात इतर क्षेत्रांपेक्षा अधिक महत्त्वाचे ठरलेले आहे. म्हणूनच सिनेमा कोणाकरता हा प्रश्न कधी नव्हे एवढा महत्त्वाचा ठरतो.

मात्र या प्रश्नाचे उत्तर निव्वळ सामाजिक वा आदर्शवादी, मनोरंजन वा कलावादी किंवा केवळ बौद्धिक अशा कंपूंतूनच तेवढे येत राहिलेले आहे.

सिनेमा या प्रकाराकडे बघण्याचा हा शास्त्रीय दृष्टिकोण नव्हे. प्रतिमांचे, चिन्हांचे, संदेशांचे, विश्लेषण करणारी शास्त्रे या प्रकाराकडे आज गांभीर्याने बघू लागली आहेत, याची जाणीव नसलेली वृत्तपत्रे आणि अन्य नियतकालिकांतील सिनेसमीक्षा सिनेमा या प्रकाराबाबत अशास्त्रीय दृष्टिकोण तयार करण्यात मग्न आहे. तिला या प्रकारच्या चर्चेशी कोणतेच देणे घेणे उरलेले नाही.

मात्र सिनेमा या प्रकाराकडे नव्याने बघायचे याचा अर्थच सिनेमाच्या भाषाशास्त्रापासून तो प्रतिमांच्या, चिन्हांच्या, संदेशांच्या व संज्ञापनाच्या शास्त्रीय पार्श्वभूमीवर सिनेमा या माध्यमाकडे ज्ञानवंत होऊ घातलेल्या नव्या समाजाच्या, नव्या जगाच्या दृष्टीने बघणे होय.

साधारणतः १९६० ते १९८० या दोन दशकांच्या काळात ही नवी दृष्टी बाळगण्याची चळवळच जगभर प्रभावी होती. 'फिल्म सोसायटी मूव्हमेंट' त्या वेळी जोरात होती. ही 'दृष्टी' प्रदान करणारी 'सिनेमा' ही - छोट्या छोट्या प्रेक्षक समूहांमधून दाखवण्याची मोठी चळवळच त्या काळात जगभर झाली. मात्र ज्या वेगाने ही चळवळ पसरली त्याच वेगाने ती ओसरली देखील. मात्र तिच्या या चढ-उतारातच सिनेमाविषयक अभिरुचीचे सिने-संज्ञापनविषयक चढ-उतार देखील सामावलेले असल्याने जोवर अशा 'दृष्टी'चे चेतक जीवन अवतीभवती असणार नाही तोवर 'सिनेमा' देखील खऱ्या अर्थाने 'सिनेमा' असणार नाही. ■

**कृष्णकुंज, खरे टाउन, धरमपेठ, नागपूर ४४००१०**

जेव्हा समाजात नवे विचार मांडले जातात, नव्या संकल्पनांना जन्म दिला जातो, नव्या संस्थांची उभारणी करण्याचा प्रयत्न होतो, नव्या मूल्यांचा पुरस्कार होतो तेव्हा ते सारे व्यक्त करण्यासाठी भाषेलाही आपल्यात बदल करावे लागतात. नवी परिभाषा निर्माण करावी लागते. नवे शब्द तयार करावे लागतात. समाजाचा वैचारिक व्यवहार जेवढा समृद्ध असेल तेवढी त्या समाजाच्या भाषेतही भर पडत जाते.

**न्या. नरेंद्र चपळगावकर,** मराठवाडा साहित्य संमेलन, डिसेंबर २००४
अध्यक्षीय भाषण

# कोकणा समाजाचे भाषिक वेगळेपण

कैलास महाले

प्रत्येक समाजात निरनिराळ्या संदर्भात वापरावयाचे भाषासंच तयार झालेले असतात. अशा निरनिराळ्या भाषासंचांचे मिळून व्यक्तीचे अथवा समाजाचे भाषिक भांडार तयार होते. या भाषिक भांडारात संदर्भागणिक वेगवेगळे कप्पे तयार झालेले असतात. हे कप्पे त्या त्या क्षेत्राशी संबंधित असतात. नाशिक जिल्ह्याच्या त्र्यंबकेश्वर तालुक्यातील कोकणा समाजाच्या भाषासंचांची माहिती काही शब्दांच्या साहाय्याने देण्याचा प्रयत्न या टिपणात केला आहे. या तालुक्याच्या दक्षिणेकडील अतिशय डोंगराळ भागात कोकणा जातीचे लोक सर्वाधिक प्रमाणात राहतात. प्रमाणभाषेशी तुलना केली असता या लोकांच्या बोलण्यातील शब्द हे वेगळे व मनोरंजक वाटतात.

सणउत्सवासाठी वापरले जाणारे भाषिक संकेत :

नागपंचमी - 'पचवी', रक्षाबंधन - 'पोवतीपुनव', सर्वपित्री अमावास्या- 'पितारपाट', दसरा - 'सिद्सोनं', भाऊबीज - 'ओवाळणी', वटपूजा - 'आहेपुनव', शिमगा - 'शिवंगा'.

याशिवाय वाघबारशी, जेठाचा सण इत्यादी सणांचे शब्द प्रमाणभाषेत आढळत नाहीत; कारण हे सण फक्त कोकणा समाजातच साजरे केले जातात.

संकेतांतील वेगळेपणा समजण्यासाठी त्या समाजाच्या चालीरिती पाहणे महत्त्वाचे ठरते. त्यातून त्या त्या शब्दांचे अर्थ समजतात. उदाहरणार्थ, ''पोवती पूनव''. राखी पौर्णिमेसाठी वापरल्या जाणाऱ्या या संकेताची फोड अशी करता येते. राखीला कोकणा भाषेत 'पोवती' असे म्हणतात आणि 'बांधणे'ला 'पोवने'. बहीण भावाला राखी बांधताना त्यांच्या संभाषणात ''नीट पोऊ दे'' असा शब्द येतो.

दिवाळी या सणाला 'दिवाळी' असेच म्हणतात. परंतु या उत्सवात गाई-म्हशींना जो नैवेद्य देतात त्यास ''बोनं'' हा शब्द वापरला जातो. तो त्यांच्या परंपरेतून आला आहे. गुढी पाडव्याला गुढी उभारण्यापूर्वी तांब्याखाली जे फडके टाकतात त्याला ''चिंदुक'' असे म्हणतात, तर प्रमाणभाषेत त्यासाठी ''वस्त्र'' हा शब्द वापरला जातो.

दसऱ्याच्या दिवशी दगडी देवाची पूजा केली जाते तेव्हा 'पूजा करणे'ऐवजी ''पहांजी देणे'' असे म्हटले जाते. पित्री अमावास्येला उकिरड्यावर काकडी नेऊन ठेवतात तेव्हा ''बोळावणे'' असा शब्दप्रयोग केला जातो. तर 'होळी पेटवणे'ऐवजी ''होळी चेटवणे'' असे म्हणतात.

या समाजात देवतांना आजही महत्त्वपूर्ण स्थान आहे. त्यांच्यासाठीचे शब्द वैशिष्ट्यपूर्ण आहेत :

''बहिरी'' हे कोकणा लोकांचे कुलदैवत. भैरव हे या देवतेचे खरे नाव असून त्या ऐवजी ''बहिरी, भयरोबा'' अशी रूपे वापरली जातात. देवी ''भवानी'' ऐवजी ''भोवानी'' तर मारुतीला ''मारवती'' आणि परमेश्वराला ''परमेसर'' म्हटले जाते. ''वाघ्या'' - जंगलातील वाघाने त्रास देऊ नये म्हणून दगडी देवाची पूजा करतात त्या देवतेसाठी ''वाघ्या'', ''वाघदेव'' हे संबोधन वापरले जाते.

अशा प्रकारे आजही प्रमाणभाषेशी या शब्दांची पडताळणी करून पाहता काहीसे साम्य पण बऱ्याच प्रमाणात भेद असल्याचे आढळते. शिक्षणाचा विकास नसल्यामुळे कोकणा समाजातील लोकांचा प्रमाण भाषेशी हवा तितका संबंध येत नाही त्यामुळे भेद टिकून आहेत. हे रूढ संकेत वापरत कोकणा समाज आपले भाषिक वेगळेपण टिकविण्याचा प्रयत्न करीत आहे.

■

मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७.

प्रत्येक काळ हा समाजासमोर नवी आव्हाने आणि नवे प्रश्न निर्माण करत असतो. त्यासाठी समाजाच्या मार्गदर्शकांनी नव्याने विचार करावा लागतो आणि इतरांचे विचारही मोकळ्या मनाने ऐकून, समजून घ्यावे लागतात. समाजात असा संवाद चालू रहावा लागतो. संवादात सहभागी होणाऱ्या सर्व घटकांना एकमेकांविषयी किमान विश्वास वाटावा लागतो तसच संवाद वाढतो. समाजात विविध कारणांनी वाढलेल्या कटुतेमुळे, एकमेकांविषयीच्या अविश्वासामुळे आणि पूर्वग्रहामुळे व्यक्तिव्यक्तीत, समाजाच्या घटकाघटकांत फारसा संवादच होत असलेला आज दिसत नाही. हे वातावरण समाजाच्या प्रगतीसाठी तर हानिकारक आहेच. परंतु ते भाषेच्या, संस्कृतीच्या आणि साहित्याच्या अभिवृद्धीसाठीसुद्धा अनिष्ट आहे.

**न्या. नरेंद्र चपळगावकर,** मराठवाडा साहित्य संमेलन, डिसेंबर २००४
अध्यक्षीय भाषण

# "मित्र मराठी शाळांचे"

डॉ. उर्मिला पिटकर

मातृभाषेतून शिक्षण हे सहज, सोपे, नैसर्गिक व म्हणूनच आनंददायी असते. मुलाच्या सर्वांगीण विकासासाठी ते अत्यावश्यक आहे, असे जगातले सर्व शिक्षणतज्ज्ञ ठासून सांगत आहेत. तरीही त्याकडे दुर्लक्ष करून बहुसंख्य मराठी पालक मराठी शाळांकडे पाठ फिरवून इंग्रजी माध्यमाच्या शाळांकडे वळत आहेत. मूल इंग्रजीत मागे पडेल, त्याचे व्यक्तिमत्त्व चौफेर होणार नाही, तो 'स्मार्ट' होणार नाही, अशी अनेक कारणे यासाठी दिली जातात.

याच विषयाचा समग्र ऊहापोह करणारा 'का नको मराठी शाळा' हा शुभदा चौकर यांचा लेख २८ फेब्रुवारी, २००४च्या 'लोकसत्ता-चतुरंग' पुरवणीत प्रसिद्ध झाला होता.

या लेखाबाबत समाजाच्या सर्व स्तरांतून, महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून खूप मोठ्या प्रमाणावर प्रतिक्रिया आल्या. काही सुजाण पालक, शिक्षक, संस्थाचालक या चर्चेद्वारे एकत्र आले व अतिशय उत्स्फूर्तपणे 'मित्र मराठी शाळांचे' या मंचाची संकल्पना आकाराला आली. काही ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञ, शिक्षणप्रेमी, मुख्याध्यापक, शाळाचालक व पालक यांच्या एकत्रित प्रयत्नांतून हा मंच आकाराला आला.

१ मे २००४ ला महाराष्ट्र-दिनाचे औचित्य साधून मंचाची पहिली सभा रूपारेल महाविद्यालय, माटुंगा येथे झाली. मराठी शाळांच्या सद्य:स्थितीत लक्षणीय सुधारणा होणे आवश्यक आहे आणि मित्रत्वाच्या भूमिकेतून व सर्वांच्या सक्रिय सहभागाने मंचाचे कार्यकर्ते हा बदल घडवून आणू शकतात, असा विश्वास या सभेतून निर्माण झाला.

सध्या मंचाचे काम मुंबईत व ठाण्यात सुरू झाले आहे. सोयीच्या दृष्टीने मुंबईचे तीन भागात विभाजन करून, प्रत्येक विभागाची स्वतंत्र सभा आता होते. आत्तापर्यंत पश्चिम मुंबई व मध्य मुंबई यांच्या ४-५ सभा झाल्या आहेत. नुकतीच ठाणे येथेही मंचाची सभा झाली. या सभांत लोकांनी मनापासून आपले विचार, प्रश्न मांडले व कामासंबंधी अतिशय मोलाच्या सूचनाही केल्या. मध्यंतरीच्या काळातील अनेक



अनुक्रमणिका

अनौपचारिक बैठका, तज्ज्ञांशी चर्चा, भेटी, उपलब्ध संदर्भ-साहित्याचा आढावा यातून एका कृतियोजनेचा आराखडा तयार झाला आहे.

ही कृतियोजना आखताना मातृभाषेचा भक्कम पाया घालणे, त्याला इंग्रजीची यथार्थ जोड देणे, हे घडवून आणणाऱ्या पालक व शिक्षकांचे प्रबोधन व प्रशिक्षण आणि मुलाच्या चौफेर विकासासाठी कल्पक व पूरक उपक्रम या मुद्द्यांचा प्राधान्याने विचार केला आहे. मराठीचा संभाषण, श्रवण, वाचन, लेखन या चारही भाषिक कौशल्यांच्या अंगांनी विकास होण्यासाठी वाचन-संस्कृती, सादरीकरण-कौशल्य, माध्यमांची ओळख, विविध कलांचा आस्वाद असे उपक्रम समाविष्ट केलेले आहेत.

१ली ते १०वीपर्यंतच्या मुलांनी जी अवांतर पुस्तके आवर्जून वाचवीत, त्यांची एक यादी प्रकाशित होणार आहे. या यादीत इयत्तेनुसार मुलांनी जरूर वाचावीत अशा निवडक साहित्याचा समावेश असेल. यादीत बहुतांश मराठी व काही प्रमाणात इंग्रजी व हिंदी भाषांतील पुस्तकांचाही अंतर्भाव असेल.

या सूचीनुसार शैक्षणिक वर्षाच्या सुरुवातीलाच प्रत्येक वर्गासाठी शाळेने ६० ते ७० पुस्तकांची खरेदी करावी. येणारा खर्च वर्गातील सर्व मुलांनी समान वाटून घ्यावा. या पुस्तकांची दर आठवड्याला अदलाबदल करावी. या प्रकारे एका वर्षात सुमारे ४० व पूर्ण शालेय जीवनात सुमारे ४०० पुस्तके मुलांना वाचायला, हाताळायला, न्याहाळायला मिळतात. तीही काळजीपूर्वक निवडलेली, सर्व साहित्यप्रकाराशी ओळख करून देणारी !

मराठी शाळेत घालताना मूल इंग्रजीत मागे राहील, अशी भीती पालकांना वाटत असते. पण इंग्रजी भाषेचा संभाषण, श्रवण, वाचन व लेखन या चारही कौशल्यांच्या अंगाने अभ्यास व सराव केला तर मूल ही भाषा सहज आत्मसात करू शकते. काही शाळांतून गेल्या ७-८ वर्षांपासून काही पालकांनी एकत्र येऊन इंग्रजीसाठी असा पूरक उपक्रम चालवला आहे. याचा परिणाम म्हणून मराठी शाळेतील मुले इंग्रजी उत्तम बोलू तर शकतातच, पण इंग्रजी वाचनाची गोडी लागण्याएवढी त्यांची इंग्रजीची तयारी होते. असे उपक्रम सर्व मराठी शाळांत सुरू व्हावेत.

'सेमीइंग्रजी' माध्यम म्हणजे आठवीपासून विज्ञान व गणित विषय इंग्रजीतून शिकवणे, हा चांगला पर्याय काही शाळांनी निवडला आहे. तिसरीपासूनच्या इंग्रजी भाषेच्या पूरक उपक्रमांमुळे हे 'सेमी' माध्यमही मुलांना सोपे जाते व सेमी माध्यमाचा खूप फायदा महाविद्यालयात शिक्षण घेताना होतो. इंग्रजीबाबतची ही धोरणे बहुसंख्य मराठी शाळांनी स्वीकारल्यास इंग्रजीचा प्रश्न बराच सुकर होईल.

पालकांचे प्रशिक्षण, प्रबोधन खूप आवश्यक आहे. शिक्षण देणे म्हणजे काय?





अनुक्रमणिका

मुलाचा विकास म्हणजे काय ? मुलांशी संवाद कसा साधावा ? लाड नेमके कसे करावे ? असे अनेक प्रश्न पालकांच्या मनात असतात. पालकांसाठी शाळेत छोट्या-छोटया कार्यशाळा, गटचर्चा, संवाद-कट्टा अशा उपक्रमांतून पालकांची मनोभूमिका तयार करणे, हेही मंचाच्या कार्यात अभिप्रेत आहे.

शिक्षक हा तर शिक्षणव्यवस्थेचा आत्मा. शिक्षकांचा भाषेचा स्तर वाढवणे, अवांतर वाचन वाढवणे, सृजनात्मक शिक्षणाच्या पद्धतींशी ओळख करून देणे यासाठीही गटचर्चा, कार्यशाळा, तज्ज्ञांशी भेटी, लिखित साहित्य तयार करणे असे उपक्रम कृती योजनेत आहेत.

विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण कौशल्याचा विकास होण्यासाठी आवश्यक अशा मुद्द्यांच्या कृती-योजनेत समावेश आहे.

प्रत्येक शाळेच्या गरजा वेगवेगळ्या आहेत. या कृती-योजनेतील आपापल्या शाळेत आवश्यक उपक्रम हेरून ते प्रत्यक्ष राबवण्यासाठी प्रत्येक शाळेमागे पाच ते सहा पालकांचा एक गट असावा, या गटाने योग्य नियोजन करून शाळेच्या सहकार्याने हे उपक्रम राबवावे, अशी संकल्पना आहे.

या कृती-योजनेतील प्रत्येक मुद्द्याचा स्वतंत्रपणे व बारकाईने विचार करून एक परिपूर्ण प्रकल्प अहवाल तयार करण्याचे काम आता हाती घेण्यात आले आहे. या प्रकल्प अहवालात एखादा उपक्रम घेण्यासाठी आवश्यक सर्व मुद्दे (उदा० उपक्रमाचा आशय, आवश्यक मुद्दे, लेखी साहित्य, अन्य साहित्य, एकूण कालावधी, विद्यार्थी संख्या, वयोगट, एकूण येणारा खर्च, संदर्भ साहित्य, मार्गदर्शक व्यक्तींची सूची, उपयुक्त व्यक्तींचे संपर्क क्रमांक) असतील. त्यामुळे 'मित्र मराठी शाळांचे'शी संलग्न शाळांना व कार्यकर्त्यांना उपक्रम राबवणे सोपे जाईल. ■

**(पूर्वप्रसिद्धी : लोकसत्ता)**

**अधिक माहितीसाठी संपर्क : अतुल पिटकर, ०२२-२३८७६५७१**

> शिक्षितांचा वर्ग वाढला म्हणजे वाङ्मयाच्या अभिरुचीसंपन्न वाचकांचा वर्ग आपोआप वाढतो हे खरे नाही. अगदी शहरात राहणारे, ज्यांच्या अनेक पिढ्यांना शिक्षणाचा लाभ मिळाला त्यांच्यापैकी काही मुले मराठीच काय, कोणतेच वाङ्मय अजिबात वाचत नाहीत. मराठी वाङ्मय वाचणे आपल्या उन्नयनासाठी आवश्यक आहे असे त्यांना त्यांच्या पालकांनी किंवा शिक्षकांनी सांगितलेच नसावे किंवा त्यांनी ते ऐकले नसावे. तुमच्या ऐहिक उन्नतीसाठी मराठी शिकण्याची गरज नाही, वाङ्मय शिकण्याची तर बिलकूलच नाही असे जर आम्ही विद्यार्थ्यांना बालपणापासून सांगत असलो तर ते वाङ्मयाकडे कसे वळणार ?
>
> **न्या. नरेंद्र चपळगावकर,** मराठवाडा साहित्य संमेलन, अध्यक्षीय भाषण

**पुस्तक परीक्षण**

# ''यंत्रालयाचा ज्ञानकोश''

**सदाशिव देव**

**(पुस्तक : 'यंत्रालयाचा ज्ञानकोश', लेखक : शंकर गोपाळ भिडे, प्रकाशक : राज्य मराठी विकास संस्था, मुंबई. २००४, पृष्ठे : १११०, किंमत : रु. १५००/-)**

यंत्रोपकरण कारखानदारी ही सर्व उद्योगात केंद्रस्थानी मानली जाते. अशा यंत्रालयातील कर्मचाऱ्यांना यंत्रोपकरणांच्या उपयुक्ततेबद्दल माहिती झालेली असते; पण त्यांना या विषयाबद्दल सैद्धांतिक माहिती नसते. ती माहिती ज्या कामगाराला असेल तो चांगली निर्मिती करू शकतो. कामगारांना उद्योग-व्यवसायाची जाण असेल तर हीच माणसे अधिक कार्यक्षम झालेली दिसतात. मात्र अशी व्यावसायिक माहिती कर्मचाऱ्यांना त्यांच्या समजुतीच्या स्तरावर सोप्या भाषेत देणे आवश्यक असते.

तांत्रिकीचा विकास आणि तिच्याशी संबंधित उपयोजित भाषेचा विकास, हे घटक देशाच्या आर्थिक सुबत्तेशी संलग्न असतात. पण आपल्या राज्यकर्त्यांनी त्यांच्याकडे दुर्लक्षच केले आहे. गेल्या ५० वर्षांत जपानी कारखानदारीने जी प्रगती साधली त्या प्रगतीच्या तुलनेत भारतीय कारखानदारीचा विकास नगण्य मानावा लागेल. जोपर्यंत तांत्रिकी विषयावरील साहित्यग्रंथ मराठीत होत नाहीत तोपर्यंत उद्योगक्षेत्रात नवीनता दृष्टीस पडणार नाही.

याप्रकारच्या प्रश्नांना वाट करून देण्यासाठी शंकर गोपाळ भिडे यांनी 'यंत्रालयाचा ज्ञानकोश' हा भव्य कोश लिहून एक राष्ट्रहिताचे कार्य पूर्ण केले आहे. या प्रकाशनाच्या निमित्ताने मराठी भाषेच्या कोशदालनात एक महत्त्वाची व उपयुक्त अशी भर पडली आहे. तांत्रिकी क्षेत्रातील विषयावर भारतीय भाषांतून अजून कोशनिर्मिती झाली नव्हती. श्री. भिडे यांच्या या कोशामुळे मराठी भाषेने या क्षेत्रात आघाडी घेतली आहे असे म्हणता येईल.

मराठी विश्वकोशाच्या आकाराच्या १११० पृष्ठांचा हा एक भव्य ग्रंथ आहे. यंत्रोपकरण या विषयातील २७२ नोंदी असलेल्या या कोशात कर्तन साधने, औद्योगिक अभियांत्रिकी, विद्युत् उपकरणे, प्रमापी साधने, साधनांची निगा, संपूर्ण गुणवत्ता व्यवस्थापन, ज्ञानमीमांसा अशा स्वरूपाचे अनेक लेख श्री. भिडे यांनी येथे विस्तारित

स्वरूपात मांडले आहेत. या ग्रंथाला त्यांनी लिहिलेली ४२ पृष्ठांची प्रस्तावना यासारख्या कोशांना भविष्यात मार्गदर्शक ठरेल. या कोशाला २०५ पृष्ठे भरतील अशा ४ सविस्तर पुरवण्या जोडल्या आहेत. त्यांत १५० माहिती संकलन पृष्ठे, ४१२ भारतीय मानकांची (इंडियन स्टॅण्डर्ड्स) यादी, ५००० संदर्भ-नोंदी व ४००० संज्ञांची तांत्रिक विषयांतील परिभाषा यांचा समावेश आहे. या कोशात १५०० आकृत्या, छायाचित्रे, चित्रे, नकाशे, तक्ते आहेत. यामुळे कोशाला घनता लाभली आहे. घट्ट बांधणी, आकर्षक मुखपृष्ठ, उत्तम मुद्रण, यांमुळे कोशाची १५००/- रु. किंमत योग्य वाटते.

इंग्रज भारतात १५० वर्षे राज्य करीत होते. त्या अगोदर भारत देश निद्रिस्त आणि मागासलेला होता असे नेहमी सांगितले जाते; पण भारतात ५००० वर्षे यंत्रे निर्माण होत असत. याचा आढावा श्री. भिडे यांनी घेतला आहे. आपला देश मागासलेला नाही हे तरुण पिढीला सांगणे भिडे यांना महत्त्वाचे वाटते. आयएस्‌ओ-९००० विषयी सर्वांना कुतूहल वाटते. असे प्रमाणपत्र मिळविण्यासाठी यंत्रोपकरणांचा दर्जा कोठल्या पातळीवर आणावा लागतो यासंबंधी सविस्तर चर्चा भिडे करतात. ज्या कंपन्यांना असा दर्जा मिळाला आहे त्यांची माहिती या कोशात दिलेली आहे.

एखादा तांत्रिक, अवघड विषय मराठी भाषेत मांडता येतो हे सत्य या कोशासाठी उपयोजिलेल्या भाषेमुळे उमगते. एवढ्या भव्य स्वरूपाचे वैज्ञानिक-तांत्रिक ग्रंथ मराठीत उपलब्ध नाहीत. कदाचित् हाच पहिला ग्रंथ असावा. हा ग्रंथ तांत्रिक विषयावर असला तरी मराठी भाषेबद्दल आस्था बाळगणाऱ्या सर्वांनीच या ग्रंथावर एक नजर टाकावी. अशा ग्रंथाला परिभाषेची गरज असते. हा ग्रंथ हाताळताना मला असे अनेक शब्द भेटले की जे मराठी साहित्यात आढळत नाहीत. जोडारी, हाती हत्यारे, तारकुंचा, काटछेद, विशालक, घटकपृष्ठ, पेषण यंत्र, लोठन निर्माणी, निरंक, षाणन, कार्बनपोलाद, मानक परुष, अंतराल, कानसन असे कितीतरी शब्द मला नवीन वाटले. अशा प्रकाशनातूनच मराठी भाषेचे व्यापक स्वरूप व्यक्त होईल.

श्री. भिडे यांचा हा कोश त्यांनी स्वतः लिहिला आहे; तो संपादित नाही. एवढा भव्य कोश लिहिणे व त्यासाठी साधनसामुग्री जमवणे हे खर्चिक, वेळखाऊ काम. पण ते त्यांनी नेटाने, तळमळीने केले याचे मला अप्रूप वाटते. शुद्ध भाषा, नेमस्त लेखन व कोशाचा आराखडा याविषयी त्यांचे वेगळेपण लक्षात येते.

पवई(मुंबई), येथील औद्योगिकी शिक्षण संस्थेच्या (I.I.T.) तांत्रिकी विभागातील सामान्य कर्मचारी म्हणून त्यांनी नोकरी केली. नोकरीच्या काळात त्यांनी यंत्रासंबंधी ज्ञान मिळवले व ते सुसंगतपणे एकत्रित केले. अशा प्रकारे श्रद्धापूर्वक केलेल्या प्रयत्नातून हा मोठा कोश साकार झाला. श्री. भिडे यांनी अन्य १८ ग्रंथ लिहिले व

प्रकाशिक केले असून तांत्रिक शिक्षण व्यवस्थेत ते आज मोठ्या प्रमाणात वापरले जातात. तांत्रिक क्षेत्रातील कर्मचाऱ्यांसाठी अनेक अभ्यासवर्ग, कार्यशाळा योजल्या जातात, त्यासाठी ते सन्माननीय व्याख्याते म्हणून जात असत. याच प्रयत्नातून त्यांना परदेशी जाऊन तेथील कार्यपद्धती अभ्यासण्याची संधी मिळाली. ■

**१२ प्रेसी बिल्डिंग, मळा, पणजी ४०३००१ गोवा, दूरध्वनी (०८३२)२२२५८१६**

## नवा शब्दकोश

'भाई' हे संबोधन आपण किती आदरानं बोलत असू. केवढा आदर, जिव्हाळा होता 'भाई'मध्ये ! आता 'भाई' शब्दामध्ये केवढी दहशत आहे. बघा, ज्या संज्ञेचा उपयोग एकेकाळी सर्वात आवडत्या व्यक्तिमत्त्वाविषयी आपण करायचो, तोच शब्द खाडकन् दगडी चाळीच्या पायाशी जाऊन पडला. शब्दाचं नशीब-नशीब म्हणतो ते हेच. पूर्वी मोगऱ्याची कळी कशी ? तर टपोरी ! टपोरी कळी आपल्या डोळ्यासमोर त्यातल्या गंधांसह, पुष्टपणासह डवरून यायची. आज 'टपोरी' हे विशेषण गँग-गुन्हेगारी वृत्तीच्या पोरांचं टोळकं या अर्थानं वापरतात. बघा नं. 'टपोरी' कुठं जाऊन तडमडला ते !

काही शब्दांचा उपयोग काही रसिक मंडळी कसा करतात, तेही बघण्यासारखं आहे. कार्यक्रम संपल्यावर माझे एक परिचित त्यांच्या मित्रांना सांगत होते, 'खूप दमलोय, महापूजा मांडूया का ?' मला कळेना, आता रात्री साडेदहा अकराला कुठली महापूजा ! पण त्यांची महापूजेची तयारी लवकरच कळली न् माझ्या अज्ञानाची धुंदी उतरली. पूर्वी प्रसादापूर्वीच्या पवित्र जलासाठी 'तीर्थ' शब्द वापरत.

आता हे 'तीर्थ'ही 'त्या' महापूजेतलं होतं चाललं - बघा, तीर्थपणाचा प्रवास कुठल्या दिशेने सुरू झाला आहे तो ! हे काही सहज आठवले ते नमुने. नशीब फिरलेल्या शब्दांचा खजिना माझ्यापाशी जमला आहे.

पूर्वी 'पेटी' म्हणजे लाकडाची किंवा पत्र्याची पेटी असा भाबडा अर्थ होता; पण आता पेटी स्मार्ट झाली. एक पेटी - दोन पेटी हे गणित राजकारण्यांना पाठ असतं. अमुक अनधिकृत बांधकाम मंजूर करायचंय; मग तीन पेट्या लागतील. म्हणजे तीन लाख असा सरळ हिशेब. बघा पेटीच्या नशिबात लाखाची गोष्ट आली. यातही काही ठरवणं असतं. गुन्हेगारांमध्येही देण्या-घेण्याचा व्यवहार फार निर्मळपणे, समजुतीनं ठरवतात. त्या व्यवहाराच्या बैठकीचा नवीन शब्द नुकताच कळला. 'मांडवली' करणं. चला 'मांडवली' करूया म्हणजे किती पेट्या द्यायच्या-घ्यायच्या त्याची चर्चा करू या ! असाच रानातला सिंहाचा छावा आता 'रुपाली'च्या कट्ट्यावर आला. क्या 'छावा' लगता है किंवा वो मेरी 'छावी' है असं म्हणत लाडक्या प्रेयसीचं कौतुक केलं जातं. प्रेयसी, सजणी, हे आता जुनं झालं. आता छावा-छावी शिकून घ्यायला हवं.

हल्ली पुष्कळ मजा करायची नसते, 'फूल टू' धमाल करायची असते आणि याबद्दल तुम्ही काही उपदेश करायला लागलात रे लागलात की 'पकवायला लागला' म्हणून तुमचा सत्कार होणार असतो. 'लई पकवतो' असं कुणी म्हटलं की तिथून काढता पाय घेतलेला बरा. पार्टी उकळायची असेल तर हल्ली मित्र मित्राला 'कापणार' असतात आणि आनंदाच्या वेळी कुणी अचानक टपकला की 'लोच्या' होणार असतो. **प्रवीण दवणे,** 'सकाळ' : १५-१०-०४

# ओडिशा राज्य व ओड़िया भाषा

नीळकंठ रथ

आपल्या पत्रिकेतील दिवाळी, २००४ अंकामधील 'ही कोण भवानी' या लेखातील एक-दोन बारीक मुद्द्यांवर एक ओड़िआ वाचक या नात्याने मला खालीलप्रमाणे सांगायचं आहे :

(१) 'उडिया' म्हणून भाषा नाही ! ओड़िशा राज्याची भाषा सुचवायची असेल तर त्या भाषेचं नाव 'ओड़िआ'. (गेल्या पन्नास वर्षांत कित्येक मराठी दैनिक आणि साप्ताहिकांना ह्याबाबत पत्र लिहून थकलो आहे).

(२) पहिल्या विक्रीला ओड़िआमध्ये 'बहिनी' म्हणतात, 'वहिनी' नव्हे !

(३) लेखिकेने लिहिले आहे, ''मराठी 'बहिणीची' उडिया भाषेत भउणी होते.'' माझ्या समजुतीप्रमाणे आणि ओड़िआ पंडितांच्या मते 'भउणी' संस्कृत 'भगिनी' शब्दाचा अपभ्रंश आहे.

आता या विषयावर दोन गोष्टी जरा विस्ताराने लिहिल्या तर चालेल ना? लेखिकेने (रोमन) लिपीत नाव वाचून मराठीत लिहिले असावे. इंग्रज लोक Oriya लिहिताना ओड़िआमधल्या कोमल ड़ च्या उच्चारासाठी 'r' लिहित असत. उदा० 'राठोड़'साठी 'Rathor'. हल्लीचे भारतीय इंग्रजांच्या त्या सूक्ष्म विचाराबद्दल अज्ञ दिसतात. भारतीय भाषेत 'ड' आणि 'ढ'चा उच्चार शब्दाच्या प्रारंभी कठीण आणि शब्दाच्या मध्ये किंवा शेवटी कोमल असतो. कोमल उच्चार दर्शवण्यासाठी 'ड' आणि 'ढ'च्या खाली टिंब देत असत. पण नाही दिले तरी चालते, कारण आपण उच्चारात हे सहज पाळतो. तसंच, मराठीत लिहिताना 'ओरिसा' लिहितात. वास्तविक प्रान्ताचं नाव 'ओड़िशा'. मात्र ओड़िआभाषक लिहिताना 'स', 'श' आणि 'ष' नीट पाळत असले तरी उच्चारात तिन्हींसाठी 'स'-च उच्चार करतात (बांगलाभाषी तिन्हींसाठी 'श' उच्चार करतात.) म्हणून, इंग्रज ओड़िशा लिहिताना Orissa लिहीत. ss लिहिण्याचे कारण एकच s लिहिले तर त्याचा 'ज' उच्चार व्हायची शक्यता.

ओड़िआ लिपीमध्ये 'व' नाही. वर्णमालेत जिथे 'व' असायला पाहिजे तिथे

पुन्हा 'ब' आहे. संस्कृतोद्‌भव शब्दांसाठी जिथे 'व' असायला पाहिजे तिथे 'ब' लिहिला जातो. त्याला एकच अपवाद : जोडाक्षराचा. ओड़िआ लोक 'पक्व' लिहिताना 'प'ला 'ब' जोडतात ('व' नाही), मात्र उच्चार करताना 'व' उच्चार करतात. बांगलाभाषी सुद्धा तसेच करतात. 'व' नसल्यामुळे संस्कृत श्लोक ओड़िआ लिपीत लिहिताना 'व' ऐवजी 'ब' लिहितात. इंग्रजी नाव लिहिताना तर तारांबळ उडते. 'ओ' लिहून त्याच्याखाली 'ब' ( 'व'साठी )चे चिन्ह देतात - व्याकरणीय घोर पाप ! आता 'व' अक्षर ओड़िआमध्ये घालायचा प्रयत्न सुरू आहे. ■

**१६-१९/५, पटवर्धन बाग, एरंडवणे, पुणे ४११ ००४.**

## दैना मराठी भाषेची की माणसांची

मुंबईतील मराठी भाषेचा व माणसांचा प्रभाव किती झपाट्याने कमी होत चालला आहे याचा अनुभव जागोजागी येऊ लागला आहे. मराठी माणसाचा राजकीय प्रभाव कमी होत चालल्याचे निवडणुकीतून दिसत आहेच. आर्थिक क्षेत्रात मराठी माणूस कधीच आघाडीवर नव्हता. या क्षेत्राकडे मराठी माणसाने कधी गंभीरपणे पाहिले नाही. आर्थिक क्षेत्र म्हणजे उद्योगक्षेत्र, अशी व्याख्या आपण करतो व उद्योग हा मराठी माणसाचा स्वभाव नाही, असेही म्हणतो. पण उद्योग केला नाही तरी मोठमोठ्या उद्योगक्षेत्रांमध्ये मोक्याच्या जागा मिळविणे मराठी माणसासाठी शक्य होते. पण त्यासाठी मानसिकता बदलण्याची आणि मुख्य म्हणजे इंग्रजीसारखी ज्ञानभाषा व सेवाक्षेत्रांमध्ये बदलत गेलेली अर्थव्यवस्था यांना समजून घेऊन आपलेसे करण्याची गरज होती. भाषा आणि अर्थसत्ता या दोन्हींवरून आज मराठी माणसाची पकड सुटलेली आहे. त्यामुळे मुंबईतील शाळांतून मराठी माध्यमाच्या तुकड्या झपाट्याने कमी होत आहेत आणि मराठी सांस्कृतिक चळवळींना जाहिरातींच्या माध्यमातून पैसा उपलब्ध होणे जवळजवळ अशक्य झाले आहे. बलवान अर्थव्यवस्थेमुळे सांस्कृतिक आत्मविश्वास येतो हे आपण कधी लक्षातच घेतलेले नाही. त्याचबरोबर भाषेला सामर्थ्यवान केले पाहिजे, हेही लक्षात घेतले नाही. इंग्रजी भाषा जो आत्मविश्वास व रोजगाराची किमान हमी देते, ती मराठीचा अभ्यास करून मिळत नाही. इंग्रजी भाषेत उपलब्ध होणाऱ्या उपयोजित ज्ञानामुळे पैसा मिळविण्याचे अनेक मार्ग समोर दिसतात, ही वस्तुस्थिती असल्यामुळे मराठी भाषेबद्दल कितीही प्रेम वाटले तरी मराठी बहुजन समाज वेगाने इंग्रजी भाषेकडे व इंग्रजी संस्कृतीकडे वळतो आहे. मुंबईतून मराठी हद्दपार होत आहे, पण फक्त चळवळी करून वा शिवसेना पद्धतीने आवाज उठवून तिचा प्रभाव वाढविता येणार नाही. मराठी जपायची असेल तर इंग्रजी आत्मसात करून सध्याच्या अर्थव्यवस्थेतील मोक्याच्या जागा मराठी माणसाने हस्तगत करणे हाच मार्ग आहे. मराठी तुकड्या कमी होत गेल्या वा दिवाळी अंकांची संख्या घटली म्हणून गळा काढण्यापेक्षा हा व्यावहारिक मार्ग अनुसरणे केव्हाही चांगले. ■

**प्रशांत दीक्षित**, 'सकाळ' : ६-११-०४

**प्रतिसाद : २**

# महाभारत आणि लोकभाषा

**विश्वनाथ खैरे**

'भाषा आणि जीवन'च्या दिवाळी २००४ अंकात श्री. कृष्ण श्री. अर्जुनवाडकर यांनी म्हटले आहे की, '' नवल हे की मराठी (क्वचित हिंदी...) वाक्प्रचार, शब्द, संकल्पना यांच्याशी मिळतेजुळते पुष्कळ वाक्प्रचार, शब्द, अर्थ, संकल्पना, भाषाविकृती इत्यादी सामग्री या ग्रंथात ('महाभारता'त) आम्हाला आढळून आली. अन्य संस्कृत ग्रंथ वाचताना सहसा न आढळणारी ही सामग्री महाभारतासारख्या प्राचीन ग्रंथात सापडते याचं मला नवल वाटलं.'' (पृ. ४२)

गाढ्या आणि चिकित्सक संस्कृत जाणकारांची ही साक्ष संस्कृत आणि मराठी (किंवा भारतीय लोकभाषा) यांच्या संबंधाचे यथार्थ आकलन होण्याच्या दृष्टीने फार महत्त्वाची आहे. भारतीय लोकभाषा म्हणजे (दक्षिणी धरून) संस्कृतेतर भारतीय भाषा. संस्कृतही भारतीयच भाषा आहे; पण मुळात देवाधर्माची, नंतर साहित्याची प्रमाणभाषा आहे. प्रमाणभाषा ही लोकभाषांतून किंवा लोकबोलींतूनच घडवलेली असते हे आधुनिक भाषाविज्ञानात मान्य झालेले तत्त्व प्राचीन भारतीय परिस्थितीत संस्कृत आणि भारतीय भाषा (बोली) यांनाही लागू पडते असे म्हणायला या विधानांचा आधार मिळतो. अर्जुनवाडकरांच्या लेखातल्या नोंदींचे तपशीलवार विवेचन केले तर आणखी उद्‌बोधक तथ्ये उघड होतील.

महाभारतात मराठमोळीचा आढळ होण्याचे 'नवल' वाटण्याचे कारण 'मराठी ही संस्कृताधारित भाषा' असल्याची प्रचलित भाषाविज्ञानातली धारणा हे आहे. ते नवल आणि ती धारणा वस्तुनिष्ठ पद्धतीने पारखण्यासाठी लेखात नोंदलेल्या काही शब्दांचे विवेचन पुढे केले आहे.

**वनस्पतींची नावे**

'करवंद' हे मराठी नाव महाभारतात 'करमर्द' या रूपात आले आहे. कोशात याची 'करामर्द, कराम्बुक, कराम्लक' अशी आणखी काही रूपे दिलेली आहेत. याचा अर्थ असा की वेगवेगळ्या संस्कृत कवी-लेखकांनी करवंद या मराठी शब्दाचे 'उद्‌भ्रंश'

आपल्या कृतींमध्ये वापरले. सरळ 'करवन्दम्' असा शब्द वापरला असता तर सर्व भाषांची जननी मानलेल्या भाषेत त्यांना तो चालला नसता. म्हणून 'कर' या ध्वनीशी मिळताजुळता भाग कायम ठेवून पुढल्या 'वंद' या भागासाठी 'अमर्द अम्बुक, अम्लक' असे ज्याला जे वाटले त्याने ते संस्कृत शब्द जोडले. 'न दबणारा, अंबट, आंबट' असे काही अर्थ त्यांना देण्यात येतीलही; पण ते निमित्तमात्र होते. करवंद शब्दातल्या '-वंद' या भागाचे 'मूळ संस्कृत' कल्पिलेले ध्वनिरूप 'कर-' या संस्कृत भासणाऱ्या भागाला जोडण्याचा तो अट्टाहास होता. 'कर'चा अर्थ 'हात', त्याचा 'करवंद'च्या अर्थात काहीही हात नाही हे उघडच आहे.

''मराठी ही संस्कृताधारित भाषा असल्यामुळे बहुसंख्य मराठी शब्दांची मुळं संस्कृतात आढळावी यात काही नवल नाही'' (पृ.४२) अशी भाषाविज्ञांची धारणा पक्की असल्यामुळे 'करवंद'चे मूळ या चार शब्दांपैकी 'सं. करमर्द, प्रा. करमद्द' असे महाराष्ट्र शब्दकोशात दिले आहे. या व्युत्पत्तीवरून काही अर्थबोध होत नाही.

महाभारतासारख्या प्राचीन ग्रंथात हा उद्भ्रंश सापडतो याचा अर्थ असा आहे की महाभारतातल्या या प्रकरणाची रचना ज्या काळात झाली असेल त्याच्या आधीपासून त्या रचनाकाराच्या बोलीत 'करवंद'सारखा शब्द प्रचलित होता. तो त्याच्या अनेक पिढ्यांआधीच्या पूर्वजांनी रूढ केलेला होता आणि तो त्या फळाच्या वा झाडाच्या रूपवर्णनाशी अर्थसंबंध राखणारा होता. केवळ संस्कृत-प्राकृत-मराठी यांच्या वावरात अडकून न पडता कन्नड-तमिळादी दक्षिणी भाषांकडे नजर टाकली तर हा अर्थसंबंध कळून येतो. 'करु' या शब्दाला दक्षिणींमध्ये जे अनेक अर्थ आहेत. त्यापैकी एक महत्त्वाचा अर्थ 'काळा' हा आहे. (त्याचा मराठीतला आढळ 'करपणं' या सुपरिचित शब्दात होतो.) आजही करवंद विकणारे त्याला 'काळी मैना' म्हणून नावाजीत असतात. तेव्हा आद्य मराठी बोलणाऱ्यांनी हा विशेष वर्णाक्षरांमधून व्यक्त करणारे नाव त्या फळाला दिले असे दिसते. 'करु'चा आणखी एक अर्थ काटा असा आहे. करवंदाच्या झाडाशी तो जुळतो. करवंदाला मल्याळम् व कन्नड नावे 'करण्ड', करण्डे' अशी आहेत. त्यांच्या जवळचा शब्द 'करुडु' म्हणजे खडबडीत. (या वनस्पतीचे शास्त्रीय नामकरण Carissa carandas आहे. त्यातला दुसरा भाग 'करण्ड'चे लॅटिनी-करण आहे. करमर्द वगैरे वरचे शब्द त्या प्रकारची 'संस्कृतीकरणे' नाहीत, 'उद्भ्रंश' आहेत. कारण 'करवंद' हा त्यांचा 'अपभ्रंश' आहे असे सूचित करावयाचे असते.)

भण्डीपुष्प(भेंडाचं फूल) हाही उद्भ्रंशच आहे. दक्षिणी 'पू' = फूल, 'पूप्पु' = फुलणे, यावरून 'पुष्प'. भेंड हे झाडाचे नाव तर भेंडी हे शाकभाजीचे नाव. बेंडु हे

झाडाचे नाव कन्नड-तेलुगु भाषांतही आहे. तमिळमध्ये भेंडीला 'वेण्ड-काय्' (काय् = भाजी) म्हणतात. या दोन वनस्पतींमधले साम्य तमिळ 'वेण्डु = वाळून जाणे, पोकळ होणे' या शब्दातल्या आशयावरून दिसते. या दोन्ही झाडांचे धागे निघतात हे आणखी एक साम्य आहे. संस्कृतातील 'भण्ड'चा अर्थ विदूषक वगैरे आहे आणि 'भण्डी' हे त्याचे स्त्रीरूप आहे यावरूनही उद्भ्रंशांच्या रचनेत अर्थसंबंधाचा विचार नसतो हे स्पष्ट होईल.

**लोकभाषांची प्राचीनता**

लेखात नोंदलेल्या ''अङ्कनम् (डागणं)'' या शब्दात लोकसंस्कृतीचे दर्शन घडते. खुणेसाठी जनावरांना डाग देण्याची प्राचीन प्रथा अर्वाचीन काळातही चालू आहे. तरी 'अङ्क' या शब्दाची पूर्वपीठिका संस्कृतवरून लाभत नाही, ती लोकभाषांवरून लाभते.

तमिळ 'अङ्कै'चा अर्थ 'तळहात' असा आहे ('मराठी भाषेचे मूळ', पृ. ९.) जनावरांच्या अंगावर खूण करण्याची अगदी पहिली आणि सोपी पद्धत हाताचा छाप मारण्याची. बोटांच्या पेरांवरून आकडे मोजण्याची आणि दोन्ही हातांच्या बोटांवरून दशमान पद्धतीची सुरुवात झाली असावी असे 'अंक' या संस्कृत शब्दाचा 'अङ्कै' या दक्षिणी शब्दाशी असलेल्या अर्थ आणि ध्वनीसंबंधांवरून वाटते.

**'भवानी'च्या मुळाशी 'बोनी'**

'ही कोण भवानी?' या लेखात (ले. माधवी कोल्हटकर) संस्कृत 'वह्'वरून आलेल्या 'वहनी'चे 'बोहणी'-'भोनी' आणि मग 'भवानी' झाल्याचे सुचवले आहे. 'अशा खरेदी-विक्रीच्या व्यवहारांची जागा पुढे भवानीपेठ झाली.' (पृ.४७) हे लेखातले म्हणणे बरोबर नाही. सगळ्या मराठी गावांमधल्या बाजारपेठांना पुण्याप्रमाणे भवानीपेठ हे नाव असत नाही. पुण्यातले नावसुद्धा त्या पेठेतल्या भवानीच्या देवळावरून पडलेले आहे.

महाराष्ट्र शब्दकोशात 'बोन, बोणें, बोनें' म्हणजे 'नैवेद्य, प्रसाद' असा अर्थ दिला आहे. खेड्यापाड्यांत 'निवदबोनं' असा जोडशब्द प्रचारात आहे. दिवसातली पहिली विक्री देवाला वाहण्याची (निवद) किंवा ती 'प्रसाद' म्हणून मिळाल्याची भावना या शब्दातून प्रकट होते. म्हणूनच त्या विक्रीची आवक कपाळाला लावण्याचा आचारही पाळला जातो. ही आवक देवाची कृपा मानली जाते. बोनीचे भवानी हे ध्वनिरूप या कामी आले, म्हणून मोलस्वर्थ-कोशातला 'भवानी because ascribed to her auspices' हा खुलासा उचित आहे. तो त्या काळातल्या सर्वेक्षणावरून नोंदला आहे हे त्याचे मोठे बळ आहे.

हिंदीत बोना = पेरणे. पहिली विक्री ही त्या दिवशीच्या उत्पन्नाची पेरणीच असते या भावनेतून 'बोहनी' हा शब्द हिंदीतही प्रचलित आहे. त्याची 'भवानी' झाली नाही. तरी संस्कृतवरून सगळे शब्द दाखवण्याचा अट्टाहास असल्यामुळे (नागरी प्रचारिणी सभेच्या) कोशात बोनाचे मूळ 'सं. वपन' आणि बोहनीचे मूळ 'सं. बोधना=जगाना' हे दिले आहे ! भारतीय भाषाभ्यासाला लोकभाषांची बोधना होईल तो सुदिन !

■

३७४, सिंघ सोसायटी, औंध पुणे ४११ ००७.

**टीप :** प्रस्तुत लेखकाच्या 'व्युत्पत्तीतले गोंधळ' व 'लोकभाषा आणि संस्कृत' या दोन पुस्तिकांमध्ये या लेखातील विषयाचे आणखी पैलू दाखवले आहेत. कार्डावर पत्ता देऊन मागणी कळवली तर त्या (विनामूल्य) मिळू शकतील.

आज असुशिक्षित आणि जाणता मराठी माणूस एका हतबलतेचा अनुभव घेत आहे. समाजाच्या भ्रष्ट आणि अवनत अवस्थेचे स्वरूप त्याला दिङ्मूढ करीत आहे. आपल्या स्वार्थासाठी व्यवस्थेचे प्रत्येक यंत्र बिघडवून टाकायचे; जे दुसऱ्याचे आहे ते ओरबाडण्यासाठी, क्रूरपणे लुबाडण्यासाठी साळसूद हत्यारे हुडकावयाची व त्यांना गोंडस नावे द्यावयाची, सर्वांच्या भल्याची आरोळी ठोकून स्वतःच्या भल्याची तरतूद करावयाची, हा शिष्टसंमत मार्ग होऊ पाहात आहे. समाजातले बलवान घटक असे वागू लागले की अगदी लहान माणसेही स्वार्थाचे आणि त्यासाठीच्या क्रौर्याचेही क्षुद्र प्रकार हुडकतात आणि समाजाला आणखी पोखरतात. जेथे संघर्षानंतर का होईना; पण आपल्याला काय मिळवायचे आहे हे दिसते तेथे माणसाचे मन पुढे जाण्याची धडपड करते. जेथे अंधारच असतो आणि उजेडाची तिरीप येणारी खिडकीच उघडी नसते तेथे माणसे हालचाल थांबवतात, त्यांची मनेही थंडावतात. जे घडते आहे ते असेच घडणार म्हणून निमूटपणे स्वीकारण्याची त्याच्या मनाची तयारी होते. दोनच मार्ग सामान्य माणसाला उपलब्ध असतात. एक तर लाचार बनून, आपणही भ्रष्ट बनून या प्रवाहात सामील व्हावयाचे किंवा 'माझ्या मना, बन दगड' असा विंदा करंदीकरासारख्या कवीचा उपरोधिक सल्ला खराच समजून अमलात आणावयाचा.

**न्या. नरेंद्र चपळगावकर,** मराठवाडा साहित्य संमेलन, अध्यक्षीय भाषण

## १. परिषद-वार्ता

### १ महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिकाचे वितरण :

मराठी अभ्यास परिषदेतर्फे बँक ऑफ महाराष्ट्रच्या सहकार्याने दिला जाणारा महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक (रु. ५०००/-) यंदा (२००२ व २००३ या वर्षांतील लेखनासाठी) गणितज्ज्ञ डॉ. सदाशिव देव यांना देण्यात आला. १८ डिसेंबर रोजी महाराष्ट्र साहित्य परिषदेत झालेल्या पारितोषिक-वितरणाच्या कार्यक्रमाला सूचितज्ज्ञ आणि मुंबई विद्यापीठाचे माजी ग्रंथपाल प्रा. अरविंद टिकेकर प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. त्यांनी आपल्या भाषणात आजच्या युगात तत्परतेने अचूक माहिती पुरवणाऱ्या विविध कोशांचा परिचय करून दिला आणि मराठीला ज्ञानभाषा घडवण्यातील त्यांचे योगदान लक्षात आणून दिले. डॉ. देव यांनी 'कोशवाङ्मय विचार आणि व्यवहार' या ग्रंथाच्या लेखनामागची आपली प्रेरणा स्पष्ट केली. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्रा. प्र. ना. परांजपे होते. कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी प्रास्ताविक केले. 'बँक ऑफ महाराष्ट्र'चे प्रतिनिधी श्री. मधुकर तापीकर यांनी आभार मानले. डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे यांनी सूत्रसंचालन केले.

## २. चर्चासत्र

दि. १९ डिसेंबरला मराठी अभ्यास परिषद आणि महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या वतीने एक चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते. त्यात 'शालान्त परीक्षेतील मराठी विषयाचा चिंताजनक निकाल : कारणे व उपाय' या विषयावर चर्चा झाली. डॉ. नीलिमा गुंडी यांनी प्रास्ताविकात चर्चासत्राच्या आयोजनामागची निकड लक्षात आणून दिली. पहिल्या सत्रात श्री. श्री.वा. कुलकर्णी व श्री. वा.भा. जोशी यांनी निबंध सादर केले. अध्यक्षस्थानी डॉ. अशोक रा. केळकर होते. दुसऱ्या सत्रात 'मित्र मराठी शाळांचे' या चळवळीतील कार्यकर्त्या शुभदा चौकर आणि फलटणच्या स्वामिनी रुद्रभटे यांनी विचार मांडले. या वेळी झालेल्या चर्चेत तात्कालिक व दीर्घकालीन उपाययोजनांवर भर देण्यात आला. कोल्हापूरच्या 'सृजन-आनंद-विद्यालया'च्या प्रा. लीलाताई पाटील यांनी अध्यक्षीय समारोप करताना या प्रश्नामागची सामाजिक-सांस्कृतिक गुंतागूंत नेमकेपणाने मांडली. डॉ. गं.ना. जोगळेकर यांनी आभार मानले. डॉ. मृणालिनी शहा व डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे यांनी सूत्रसंचालन केले.



अनुक्रमणिका

## ३ अभिनंदन

मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष डॉ. अशोक रा. केळकर यांच्या पंच्याहत्तरी-निमित्त डेक्कन महाविद्यालय(पुणे) या संस्थेने त्यांच्या गौरवार्थ एक खास अंक प्रकाशित केला आहे. 'बुलेटिन ऑफ द डेक्कन कॉलेज', खंड ६२-६३ (२००३-०४) या विशेषांकात डॉ. केळकरांच्या आवडीच्या विविध ज्ञानशाखांमधील विषयांवर अनेक तज्ज्ञांनी लिहिलेल्या अभ्यासपूर्ण लेखांचा समावेश आहे. ■

वाङ्मय, सामाजिक शास्त्रे आणि विमान यांच्यासंबंधी फारशी नियतकालिके प्रसिद्धच होत नाहीत. जी तग धरून आहेत, त्यांनाही फारसे वाचक लाभलेले नाहीत. शिक्षकांची, आणि शिक्षितांचीही संख्या मोठ्या प्रमाणात वाढली; परंतु ज्ञानशाखांच्या नियतकालिकांना वर्गणीदारच काय परंतु पुरेसे चांगले लेखनही मिळत नाही. विचारांचे विश्व जेवढे गरीब असेल तेवढेच दारिद्र्य आमच्या भाषेलाही येणार. आमच्या संकल्पना आणि त्यासाठीची परिभाषा हे दोन्ही फार तर पुस्तकात राहतील. लोकांच्या वापरात त्या कशा येणार ? ज्या भाषक समुदायाची संस्कृती वर्धिष्णु असते, ज्या समाजाचे विचारविश्व समृद्ध असते, जो समाज प्रगतिशील असतो त्या समाजाची भाषा सतत प्रगती करीत असते. त्या भाषेत नवनवे शब्द येतात. ज्या समाजाची संस्कृती विविध रंगांनी फुललेली असते त्या समाजाची भाषाही सतत टवटवीत असते.

आपल्या सांस्कृतिक जीवनात पोकळी निर्माण झाली अगर आपले सांस्कृतिक जीवन निकृष्ट झाले अगर आपण आपल्या सांस्कृतिक गरजासाठी मराठीचा त्याग करून हिंदीसारख्या इतर भाषांचा स्वीकार केला तर आपली सांस्कृतिक हानी होईल हे उघड आहे. भाषा ही तिच्याविषयीच्या उद्घोषाने वाढत नसते. ती तिच्या वापराने वाढते. आपल्या शहरातले मराठी हटत चालले, आपल्या करमणुकीतील मराठी हटत चालले, आपल्या संस्कृतीतले मराठी विरत चालले ही परिस्थिती आपल्या सर्वांना चिंतित करणारी आहे.

संस्कृती ही केव्हाही समाजातल्या एखाद्या छोट्या घटकाची नसते. संस्कृतीला जर बळ मिळावयाचे असेल तर ती समाजाच्या सर्व वर्गांची मिळून बनलेली असावी लागते. तिचे सर्व समावेशकत्व हाच तिचा प्राण असतो. एखादी भाषा समाजातले सर्व घटक बोलू लागले, वापरू लागले, आपल्या व्यावसायासाठीही वापरू लागले, त्यातून आपल्या भावनांचा अविष्कार करू लागले म्हणजे ती समृद्ध होते. साहित्यसुद्धा याच प्रक्रियेने श्रीमंत होते. मराठीत सर्व समाजघटकांनी लिहावे म्हणजे मराठी भाषा आणि साहित्य समृद्ध होईल हे आपल्याला अनेक मार्गदर्शकांनी सांगितले आहे. भाषेची आणि साहित्याची चळवळ सामान्य माणसांपर्यंत नेणे हाच त्यांच्या समृद्धीचा मार्ग आहे.

**न्या. नरेंद्र चपळगावकर,** मराठवाडा साहित्य संमेलन, अध्यक्षीय भाषण

## भाषाविषयक लेखनाची सूची : २००४

[**टीप :** ही सूची परिपूर्ण नाही याची आम्हाला जाणीव आहे. वाचकांनी आपल्या वाचनात आलेल्या लेखांचे व पुस्तकांचे संदर्भ कळवावेत अशी विनंती आहे. वाचकांचे सहकार्य मिळाल्यास ही सूची परिपूर्ण करता येईल. - **संपादक**]

**राजशेखर शिंदे**

### दैनिकातील लेख :

- कट्टी, राघवेंद्र. 'शुद्धलेखन अवघड का वाटते ?', **लोकसत्ता**, लोकरंग पुरवणी ११ जुलै, पृ. १.
- कर्णिक, यशवंत. 'मराठी भायली कशी ?', **लोकसत्ता**, ७ फेब्रु.
- कुलकर्णी, हेमंतकुमार. 'शुद्धलेखन हे भाषेचे खरे सौंदर्य', **सकाळ**, १७ जून, पृ. ४.
- केळकर, सुभाष. 'भांडण्यासाठीही इंग्रजी भाषाच लागते', **सकाळ**, २५ फेब्रु., पृ. ४.
- जोशी, धरित्री. 'इंग्रजीचा आग्रह कशासाठी ?', **सकाळ**, सप्तरंग पुरवणी, ६ जून पृ. ५.
- ठाकूर, अजित. 'बोल बेबी बोल', **सामना**, उत्सव पुरवणी, २२ फेब्रु., पृ. ८.
- परळकर, स.म. 'इंग्रजीची यशस्वी वाटचाल; मराठीचे काय ?', **सकाळ**, २८ एप्रिल, पृ. ४.
- पाटील, इरगोंडा. 'इंग्रजी माध्यमातून शिक्षण आणि मातृभाषा', **सकाळ**, १३ ऑगस्ट, पृ. ४
- पानसे, शरच्चंद्र. 'प्रश्न आहे भाषेच्या अस्मितेचा !', **लोकसत्ता**, २३ फेब्रु., पृ. ६.
- पुरंदरे, रूपाली. 'इंग्रजी माध्यमातून शिक्षणाचा अट्टाहास चुकीचा', **सकाळ**, २ मार्च, पृ. ४.
- दिब्रिटो, फ्रान्सिस. 'मायबोलीसी जिवे मारिले', **सकाळ** (रविवार) सप्तरंग पुरवणी, ६ जून, पृ. ४.
- बिनिवाले, अविनाश. '(बि)घडणारी भाषा', **लोकसत्ता** (मंथन - लेखमाला), १५ फेब्रु., पृ. ४.

- मालशे, मिलिंद. 'भाषांतर - विद्येच्या नव्या दिशा', **लोकसत्ता,** (लोकमुद्रा पुरवणी) ११ जुलै, पृ. ५.
- शेख, शहाबुद्दीन. 'मातृभाषा टिकली तरच संस्कृती टिकेल', **सकाळ,** ३१ डिसेंबर, पृ. ४.
- सिधये, मेधा. 'मायबोली मराठी', **सकाळ,** सप्तरंग पुरवणी, ४ जुलै
- सामंत, सत्त्वशीला. '' 'साहित्य-सहवासा'ला जेव्हा जाग येते' '', **लोकसत्ता** - लोकमुद्रा, १४ मार्च, पृ. २.
- सोनवणे, राजकुँवर. ''...तरच मराठीच्या प्रदूषणाला आळा बसेल.'' **सकाळ,** १ फेब्रु, पृ. ४.
- अग्रलेख : 'अपहार्य मराठी', **सकाळ,** ७ मे, पृ. ४.


## नियतकालिकांतील लेख :


- आंबेकर, सुधीर. 'मराठी पाहावे...शिकवून', **रुची,** फेब्रु, पृ. १६-१७.
- गुंडी, नीलिमा. 'मराठी भाषा : सद्यस्थिती आणि आव्हान, संवाद डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्याशी.' **आपला परममित्र,** मे-जून, पृ. ६-१७.
- जोशी, न.म. 'सुठी बोली मराठी', **साहित्यसूची,** जानेवारी, पृ. ४६-४८.


## ग्रंथसूची :


- उत्पात, वसंत भ. 'मराठी सौष्ठव - म्हणी - अलंकार - वाक्प्रचार', **स्नेहवर्धन प्रकाशन,** पुणे.
- काळे, श्री. वा. 'महाभारतातील सुभाषित संग्रह', उत्कर्ष **प्रकाशन,** पुणे.
- खैरे, विश्वनाथ. 'व्युत्पत्तीतले गोंधळ', **संमत प्रकाशन,** औंध, पुणे.
- ब्रह्मनाळकर, सुलभा. **मौज,** दिवाळी अंक. ■


**स.प. महाविद्यालय, पुणे ३०.**

स्वातंत्र्योत्तर मराठी समाजाच्या फेररचनेत मूल्यप्राधान्यांचीही फेररचना झालेली आहे. दारिद्र्यात राहावे लागले तरी आपली सांस्कृतिक गुणवत्ता समाजात आपल्याला आदर मिळवून देईल हा विश्वास मध्यमवर्गाला राहिलेला नाही. सत्ता आणि पैसा हीच मोठेपणाची समाजमान्य झालेली मोजमापे मध्यमवर्गानेही स्वीकारली. ज्यांना सत्ता मिळणे अशक्य आहे त्यांनी आपले लक्ष शिक्षण व नोकरीसाठी अमेरिकेत मुले पाठविण्याच्या सुंदर स्वप्नाकडे वळविले.

**न्या. नरेंद्र चपळगावकर,** मराठवाडा साहित्य संमेलन, अध्यक्षीय भाषण

## महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाची प्रकाशने

(महाराष्ट्राचे शिल्पकार)

| अ.क्र. | पुस्तकाचे नाव | लेखकाचे नाव | किंमत रु. |
|---|---|---|---|
| १ | एस्.एम्. जोशी | ग.प्र. प्रधान | ४०/- |
| २ | साने गुरुजी | राजा मंगळवेढेकर | ४०/- |
| ३ | आचार्य दादा धर्माधिकारी | तारा धर्माधिकारी | ४०/- |
| ४ | नाना पाटील | भारत पाटणकर | ३५/- |
| ५ | पद्मश्री विठ्ठलराव विखेपाटील | शिवाजी सावंत | ३५/- |
| ६ | शंकरराव किर्लोस्कर | शांता किर्लोस्कर | ४०/- |
| ७ | कर्मवीर मामासाहेब जगदाळे | व.न. इंगळे | ४५/- |
| ८ | तंट्या भिल्ल | बाबा भांड | ४५/- |
| ९ | यशवंतराव चव्हाण | विठ्ठलराव पाटील | ४०/- |
| १० | दादासाहेब फाळके | बापू वाटवे | ३५/- |
| ११ | तेजस्विनी अहिल्याबाई होळकर | सौ. विजया जहागिरदार | ४५/- |
| १२ | ताराबाई-शिंदे | डॉ. इंद्रजित भालेराव | २५/- |
| १३ | तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | डॉ. अरुंधती खंडकर | ४०/- |
| १४ | स्वा.सावरकर | डॉ. सुधाकर देशपांडे | ४०/- |
| १५ | बॅ. खोब्रागडे | व्ही.डी. मेश्राम | ३५/- |
| १६ | स्वामी रामानंद तीर्थ | प्रकाश मेदककर | ४५/- |
| १७ | पठ्ठे बापूराव | चंद्रकुमार नलगे | ४५/- |
| १८ | भाई उद्धवराव पाटील | व.न. इंगळे | ५५/- |
| १९ | धोंडो केशव कर्वे | डॉ. न.म. जोशी | ४०/- |
| २० | लोकहितवादी | डॉ.निर्मलकुमार फडकुले | ४०/- |
| २१ | यदुनाथ थत्ते | मु.ब. शहा | ४०/- |
| २२ | गोविंदभाई श्रॉफ | विजय दिवाण | ४५/- |
| २३ | रामजोशी | शिरीष गंधे | ४५/- |
| २४ | वसंतराव नाईक | डॉ. उत्तम रुद्रवार | ३५/- |
| २५ | सत्यशोधक महात्मा जोतिबा फुले | श्रीराम गुंदेकर | ४०/- |

**मंडळाची प्रकाशने मिळण्याची ठिकाणे** – सर्व शासकीय ग्रंथ भांडार. मुंबई/पुणे/ नागपूर/औरंगाबाद व महाराष्ट्रातील प्रमुख ग्रंथविक्रेते.

**अधिक माहिती/चौकशीसाठी :** सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत, ३रा मजला, १७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग, दादर, मुंबई ४०० ०१४. दूरध्वनी २४१४४०२१, २४१४६००५

(१) **'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**
वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे.
१ जानेवारी, २००२ पासून वर्गणीचे दर पुढीलप्रमाणे आहेत :
वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/- फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/- फक्त
व्यक्तीला रु. १००/- फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ४५०/- फक्त
परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रक्कम रु. १००/- अधिक पाठवावी.

(२) **आजीव वर्गणी :**
मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १,००० आणि नोंदणी शुल्क रु. १०० फक्त. पूर्वीच्या आजीव सदस्यांनी वर्गणीतील वाढीव रक्कम रु. ४०० भरावी, असे परिषदेतर्फे आवाहन आहे.**

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :**
वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये २०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता अंक याचा उल्लेख करावा.

(४) **मागील अंक :**
'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

(५) **जाहिरातीसाठी दर :**
पूर्ण पान रु. ७५०/-, अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/- शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन व चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

(२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तसेच मैसूर येथील भारतीय भाषासंस्थान यांचेही अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन, तसेच भारतीय भाषासंस्थान सहमत असतीलच असे नाही.

---

